# प्रस्तावना.




षा शास्त्राच्या अभ्यासकाच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त असें– श्री. दा. गो. बोरसे यांचें 'खानदेश वाग्वैभव' हें प्रस्तुत पुस्तक आहे, कारण त्यांत खानदेशांत बोलल्या जाणाऱ्या अहिराणी भाषेचे शेंकडो वाक्प्रचार व म्हणी संग्रहित केल्या आहेत या व पूर्वीच्या त्यांच्या 'गिरजा', 'तापीतरंग' या पुस्तकांनीं अहिराणी भाषेचें अधिक साहित्य प्रकाशित करण्याचा मान त्यांनीं मिळविलाच आहे. अहिराणी साहित्याचा संग्रह अनेकांनीं केलेला आहे. पण नेटानें तो प्रकाशांतहि आणिल्याबद्दल श्री. बोरसे अभिनंदनास पात्र आहेत.

अहिराणी–मराठी संबंधाची चिकित्सा आज भाषिक राजकारणाच्या दृष्टीनें फार महत्त्वाची व तितकीच विवाद्य झाली आहे. याचें कारण ग्रीअर्सनसारख्या जाड्या विद्वानाच्या 'अहिराणी ही गुजराथीची अेक पोटभाषा आहे' या मतांत आहे भारताच्या शेंकडो उपभाषांच्या अभ्यासांत व परीक्षणांत, अहिराणीची चार दोन उताऱ्यांच्या सहाय्यानें झटपट परीक्षा करून त्यांनीं दिलेला हा निर्णय आणि या लोकांत राहून ही भाषा आमूलाग्र अभ्यासून मराठी, गुजराथीशीं संस्कृत प्राकृतांच्या साक्षीनें उच्चार, व्याकरण

आणि अर्थांतर यांच्या कसोट्या लावल्यावर दिला जाणारा निर्णय यांत तफावत पडल्यास नवल वाटण्याचें कारण नाहीं. आणि उपरोक्त अधिकारी विद्वानांच्या विद्वत्तेला यामुळें कमीपणा येण्याचेंहि कारण नाहीं.

अहिराणी ही गुजराथीला जवळ आहे कीं मराठीला ? या प्रश्नाची चर्चा करण्याला चांगलें साधन श्री. बोरसे यांच्या या संकलित वाङ्मयानें प्राप्त झालें आहे. उदाहरणार्थः— मराठींत ज्या शद्वांत दुसरें अक्षर 'ह' कार युक्त असते, अहिराणींत तो 'ह' कार सामान्यतः पहिल्या अक्षरांत येतो. जसें:— बाहेर = भायेर, उभा = हुबा, रांध = ऱ्हांद, निघणें = न्हिगनऽ, इत्यादि. या दृष्टीनें मराठीचें अशिष्ट रूप आणि अहिराणी यांत फार साम्य आहे. पण शिष्टांच्या अहिराणींत आतां 'बाहेर', 'उभा', 'रांध', असेंहि येऊं लागलेलें आहे. मराठींत जेथें 'ळ' त्याच शद्वांत ळ च्या जागीं अहिराणींत 'य' येतो. जसें:— देऊळ = देऊय, शाळा = साय, माळ = माय, डोळा = ड्रोया, इत्यादि. पण पांढरपेशांत शिरलेल्या व सोनार, शिंपी, लाडसक्के वाणी यासारख्या समाजांत आबालवृद्ध 'ळ' स्पष्ट उच्चारतात. तोच प्रकार'ण'चा. सामान्यतः 'ण' हा आढळत नाहीं. त्याचें काम 'न' करतो. परंतु उपरोक्त समाजांत 'ण' चा स्पष्ट आणि सर्रास वापर होतो. पुष्कळ वेळां अहिराणीची 'व' आणि 'ण' योजना मराठींत कानाला गमतीची वाटते. जसें:— 'पाणी' चे 'पानी' करणारा वक्ता 'वहिनी' चे 'वहिणी' करतो. तें मराठीच्या दृष्टीनें चूक भासलें तरी भाषेच्या स्वतंत्र विकासाच्या दृष्टीनें वस्तुतः मूळाच्या 'अधिक

जवळ आहे. संस्कृत पानीयमला पानांच जवळ आणि भगिनीचे प्राकृत वहिणीला अहिराणी वाहिणी जवळ; जर मराठी वहिनी हा शब्द संस्कृत भगिनीपासून आला हें मान्य असलें तर.

अहिराणी ही मुळत. गुजराथी व मराठीपेक्षा निराळी असली पाहिजे असें ऐतिहासिकदृष्ट्या म्हणणें क्रमप्राप्त आहे. कारण सौराष्ट्री, महाराष्ट्रीचा उल्लेखहि नसणारे नाट्यशास्त्रासारखे ग्रंथ आभिरी म्हणून एक विभाषा असल्याचें नमूद करतात आणि अहिराणींतले आजचें नाम व क्रियापदाचें प्रत्यय स्वतंत्र भाषेची कसोटी म्हणून धरले, तर मराठी गुजराथीपेक्षा अहिराणीचा संचार निखालस निराळा दिसतो. पण हें वैषम्याचें गमक झालें. साम्याचा विचार करताना उच्चार, व्यवहार, अर्थवाहकता आणि समाज या तिन्ही दृष्ट्या अहिराणीला मराठीच्या प्रांतात समावेश करण्यावाचून गत्यंतर नाहीं. अहिराणी भाषाभाषी निरक्षर स्त्रिया जात्यावर व सणावाराला मराठींतहि सहजच गाणीं करतात.

तसेंच कांहीं काळाचीं रूपें मराठी–अहिराणींत एकसारखींच असल्यानें एकच वाक्य दोन्हीकडे चालतें जसे– 'लेकी बोले, सुने लागे', 'नवरा चुंबक, बायको कुचर, पाव्हणा फिरे दारोदार', 'अेक पुती रडे, सातपुती डोळे ना उघाडे' 'रोज मरे, तिले कोण रडे' इ.

खानदेशाला गुजराथीपेक्षा मराठी जवळ आहे याची प्रात्यक्षिकें प्रत्यहि घडत असतात. खानदेशांत वाचलें जाणारें धार्मिक वाङ्मय एकजात मराठी असतें. अपवादानेंहि गुजराथी पोथ्या

वाचन्ना जात नाहींत. रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप सर्व व्रतकथा या मराठींतल्याच असतात व कथाकिर्तनें मराठींतूनच होतात. सामाजिक एकजिनसीपणा हें याचें एक आणखी कारण आहे. खानदेशातल्या मराठों, भोई, कोळी या समाजांत चूल आणि पाळण्याजवळ ही भाषा वापरतात. परंतु महाराष्ट्रतील या समाजाशीं पूर्णपार परपरेनें हे समाज अभिन्नच आहेत.

हें झालें अहिराणीच्या अगंकाठी आणि तोंडवळ्याबद्दल. आतां तिच्या अतर्बाह्य साज—शृंगाराचा किंचित ऊहापोह केला पाहिजे. खानदेशातील समाज सांस्कृतिक दृष्ट्या महाराष्ट्राशींच जवळचा असल्यानें मराठीप्रमाणेंच सर्वसामान्य व्यवहारात अहिराणी मोठी टवचिक, अर्थगर्भ, आणि ठाईंठाईं विविध अलंकारांनीं नटलेली भाषा दिसते तिच्यात लक्षणे—व्यजनेचा भरपूर वापर असून शब्दालंकार व अर्थालंकाराचीं म्हणी व गाण्यागणिक उदाहरणें आढळतात. मानवी स्वभावाचें विविध व हृद्य प्रदर्शन त्यात आढळतें. जसें — " जो फुकट खाय त्याले सम्दS माबS काय ? " ' उनी याहिन भेटाले, लाई सनार वाटाले ', ' घरनी आस्तुरी वयतनसाटीं रडे पाइ राडसाठीं खोड चढनना फोडे ', ' चावडीवर बठना नीट, घरला न्हीं तिखट मीट ' इत्यादि.

या समझात शब्दावरील श्लेषाचें एक सुंदर उदाहरण आलें आहे. ' झाडी शिरसापानी नार, घरी चिमटाना म्हजार, मारी नकाना म्हजार, सोडी परतापूर म्हजार ' हा ' ळ ' बदलचा एक उखाणा आहे. झाडी—शिरसाळे, चिमठाणे, नकाणे व

प्रतापपूर हीं ग्रामनामें आहेत. सर्व खानदेशांत आहेत. पण झाडी शिरसाळे यावरून डोक्यावरचे केसांची झाडी हा दूसरा अर्थ, तसाच ग्राम अशा अर्थी चिमठाना म्हणजे याचा दुसरा अर्थ चिमट्यांत असा होतो. परतापपूर याचा अर्थ पलीकडे पूर नांवाच्या गांवांत टाकली किंवा पुरात लोटली.

या पुस्तकातच आलेल्या वाङ्मयाचें संपूर्ण रसग्रहण करूं म्हटलें तर यासारखें आणखी दोन चार ग्रंथ सहज होतील.

भाषाचें स्वरूप स्थळ आणि काल या दोन खडकावर सतत टक्कर देऊन फुटत तुटत व नवी जोड घेत असते. यामुळें सद्यःकालिन भाषांचा सूक्ष्म अभ्यास व त्यांच्या उपलब्ध लोकवाङ्मयाचा मार्मिक संग्रह करण्याची कामगिरी भाषा, इतिहास व समाजशास्त्राच्या दृष्टीनें फार फार महत्त्वाची आहे. ही कामगिरी या पुस्तकानें अंशतः बजाविली आहे. ( मात्र यातील साहित्याचा उपयोग करणारानें यांत आलेले मुद्रण दोष ओळखण्या इतपत या भाषेचा प्रत्यक्ष परिचय करून घेण्यांस विसरू नये येवढें सुचवून ठेवावेसे वाटते. )

श्री. बोरसे व खानदेश भाषामंडळ यांचें भाषा आणि समाजशास्त्र यांचा एक अभ्यासू या नात्यानें आभार मानून ही प्रस्तावना पूर्ण करतो.

राजवाडे संशोधन मंदीर
धुळें, २५ मे १९९३

–मा. रं. कुळकर्णी

खा. भा. मं. वतीनें लेखकानें आरंभलेल्या लोकवाङ्मय
संशोधन कार्यास लाभलेला आशा किरण

**I appreciate your efforts.**

मी तुमच्या या लोकवाङ्मय सशोधन प्रयत्नाचे
मनःपूर्वक कौतुक करतों.

**नामदार भाऊसाहेब हिरे.**

मुंबई. दि. २२ जून १९५३.

# लेखकाचें हृद्गत

खानदेशी भाषा मंडळाचें ' **खानदेश वाग्वैभव** ' हे पुस्तक महाराष्ट्रीय रसिकांच्या हातीं देतांना आनंद वाटतो. ' केवळ खानदेश व खानदेशी भाषेचीच नव्हे तर मराठी भाषेची ही खरोखरीच अमोल सेवा आहे ' अशा प्रकारचें प्रोत्साहन नवशक्ति सकाळ, केसरी, लोकमान्य इत्यादि प्रमुख वर्तमानपत्रांनीं व महाराष्ट्रांतील रसिक विद्वानांनी दिलें नसतें तर इतक्या लवकर खानदेशांतील हें आजवर गुप्त असलेलें भाषावैभव दाखवितांहि आले नसते. खानदेशांत रूढ असलेल्या पण महाराष्ट्रास अपरिचित असलेल्या म्हणींचा व वाक्प्रचारांचाच या पुस्तकांत समावेश केलेला आहे. या वाक्प्रचार व म्हणींवरून रसिकांना व भाषाभ्यासी लोकांना अहिराणीचा तर परिचय होईलच पण त्या शिवाय खानदेशांतील सांस्कृतिक ऐतिहासिक सामाजिक विकासाचे टप्पेहि सुकरतेनें आजमावतां येतील. महाराष्ट्रीय संस्कृतीशी खानदेशचा जिव्हाळ्याचा संबंध आहे हा सिद्धांत अहिराणीची कुळकथा या भाषाशास्त्रीय पुस्तकांत मांडला आहे त्या सिद्धांतासहि या पुस्तकांतील म्हणी व वाक्प्रचार किती बळकटी देतात हें वाचकांच्या प्रत्ययास येईल. व खानदेश हा गुजरातचा भाग नसून महाराष्ट्राच्याच कंठस्थानचा अविभाज्य असा भाग आहे या बद्दल वाचकाची खात्री पटेल. त्यामुळें महाराष्ट्रीय रसिकांच्या कृपेचा ओघ आजवर उपेक्षा झालेल्या खानदेशकडे वळेल व खानदेशी लोकवाङ्मयास सुगीचे दिवस लाभतील.

गिरजा या लोकगीत कथेच्या द्वारा खानदेशी संस्कृतीचें, जीवनाचें सौंदर्यपूर्ण दर्शन घडविलें. तापीतरगात खानदेशांतील भोळयाभाबड्या जनतेच्या सोज्वल्य व उदात्त भावना संग्रहित केलेल्या आहेत. अहिराणाची कुळकथा या भाषा शास्त्रीय पुस्तकांत सशास्त्र सखोल अभ्यास करून, अहिराणीचें महत्व वाचकास पटविण्याचा यथामतीनें प्रयत्न केलेला आहे. विवेचन करून प्रस्तुत पुस्तकात खानदेशातील स्त्री पुरुषाचें अनुभव सूत्ररुपानें ग्रथिक झालेल्या म्हणींचा व वाक्प्रचाराचा संग्रह केलेला आहे

महाराष्ट्रांतील प्रमुख वृत्तपत्रांनीं व विद्वानांनीं अत्युत्तम अभिप्राय देऊनहि व अमळनेर येथील ३९ व्या साहित्य संमेलनांत अहिराणीस उत्तेजन देण्याचा ठराव होऊनहि महाराष्ट्रांतील वाचनालयें शाळा कॉलेजातील वाचनालयें खानदशी संस्कृतीचें यथातथ्य दर्शन घडविणाऱ्या या पुस्तक खरेदीच्या बाबतींत उदासीनच आहेत. खानदेशातील स्कूलबोर्डाचें वास्तविक शालेय वाचनालयासाठीं ही सोज्वल पुस्तकें खरेदी करणें कर्तव्य होतें तथापि अधिकारी वर्गाची उदासीन वृत्ति दिसून आली. तसेंच खानदेशातील समाजशिक्षणाच्या शाळेंत हीं पुस्तकें खाजगी रीतीनें अत्यंत आवडीनें वाचनात. पण समाज शिक्षणाचे अधिकारी मात्र प्रादेशिक लोकवाङ्मय म्हणून लावण्यास नाराज असल्याचे समजते. ' स्वराज्यातील सरकारला अजून सांस्कृतिक दृष्टि आलेली नाहीं ' हा नवशक्तीकारांनीं अहिराणी लोकवाङ्मय व खानदेशी भाषा मंडळाबाबत दिलेला इशारा ( १३-१०-१९५२ ) अगदीं योग्य आहे असें अनुभवास

आले. ग्रामीणजनाच्या करभारावर पोसली जाणारी मुंबईसारखी विश्वविद्यालयें ग्रामीणजनासाठीं त्याच्या भाषा संशोधनासाठीं कांहींच करू शकत नाहीं कारण त्याच्याकडे वारंवार याचना करूनहि ग्रंथ प्रकाशन निधींतून मला अद्यापि साह्य मिळालें नाहीं. या सर्व गोष्टीमुळें मजजवळील संग्रहाचा अगदी ¼ हिस्सा मी प्रकाशित करूं शकलों. माझ्यापेक्षाहि इतर अनेक सज्जनाजवळ खानदेशी लोकवाङ्मयाचा असलेला अपार ठेवा आणखी किती दिवस अंधारात राहील याची या निराशमय परिस्थितीनें कल्पना करवत नाही. अहिराणी भाषा संशोधनास मला कोणाचीच मदत न मिळाल्यानें ' अहिराणींची घटना ' या विद्वत्तापूर्ण पुस्तकाच्या छपाईचें काम बाजूस ठेवावें लागलें. व सदर पुस्तकास कागद साधारण प्रतीचा घ्यावा लागला व सजावटही आकर्षक स्वरुपाची द्रव्याच्या अभावी करतां आली नाहीं. अंतरंगाची गोडी पारखणारे सहृदय रसिकवर्ग मला दोषी धरणार नाही अशी अपेक्षा आहे.

या निराशेंतहि खानदेशी संस्कृतीविषयींची व जीवनाविषयींची महाराष्ट्राची आस्था कायम ठेवण्याची माझी मनीषा आहे. व त्यासाठीं खानदेशी वातावरणाची पार्श्वभूमि असलेली मराठी कादंबरी " जीभाऊ " लवकरच वाचकास सादर करण्याचा विचार आहे. ' न्यू श्रीकृष्ण प्रिंटिंग प्रेस, ' जळगाव चे मालक श्री. नामदेव माधव तथा बुवासाहेब नेमाडे व ' विद्याभूषण ' छापखान्याचे मॅनेजर श्री. बाळासाहेब बेंडाळे यांनीं छपाईच्या कामीं अमोल साहाय्य दिले नसते व आर्थिक बाबतींत वागवून घेतले नसते तर

...राष्ट्रीय रसिकांच्या सेवेंत किती काळ अंतर पडले असते हें सांगतां येत नाहीं. छपाईची बिलें देणें असूनहि दोन्हीही हे सुहृद् खानदेशीं लोकवाङ्मय प्रकाशनाचा माझ्या पाठीमागें तगादा लावीत आहेत.

महाराष्ट्र रसिकानीं आश्रय दिल्यास— ( आज ना उद्यां तसा आश्रय नक्कीच मिळेल. )— अखिल महाराष्ट्रांतील ग्रामीण विभागांतील लोकवाङ्मयाचें कुबेरासहि लाजविणारे गुप्तधन उजेडांत आणण्यासाठीं ' **लोकवाङ्मय संशोधन मंदिर** ' स्थापन करण्याचा संकल्प आहे. सुदैवानें माझ्या या योजनेस विद्वानांचा रसिकांचा पाठिंबा मिळत आहे. भा. इ. संशोधन मंदिराचें व राजवाडे संशोधन मंदिराचें ध्येय ज्याप्रमाणें इतिहास संशोधन हें ध्येय आहे; त्याचप्रमाणें या संकल्पित लोकवाङ्मय संशोधन मंदिराचें उत्कृष्ट लोकवाङ्मयाचें संशोधन संरक्षण व सामाजिक सांस्कृतिक इतिहासास मदत करणें हें ध्येय आहे. यामुळें ग्रामीण भाषा व जीवन यांच्या अपूर्व शोभेची मनोरम मराठी भाषेत प्रतिति आणून देऊन रसिकांना जनाभिमुख करतां येईल व नागरिक व ग्रामीणातील सौहार्द वाढेल.

या संकल्पिक लोकवाङ्मय संशोधन मंदिरापुढें वरील लोकवाङ्मय संशोधन मंदिराप्रमाणेंच ग्रामीण महाराष्ट्र भाषा विश्वकोश हें देखिल महत्कार्य आहे. खानदेश, वऱ्हाड, कोंकण, माळदेश, मावळ या भागांतील ' लोकांचिये एक शिरीं सजावे, धनींच किंवा सुकून जावे ' या बाण्यानें वावरणाऱ्या स्वतंत्रताप्रिय गोऱ्या आ...

अनंत शब्दांना या कोशात मानाचें स्थान मिळेल ग्रामीण शब्दांचा व्युत्पत्तिसहित कोश करणें हें कितीतरी खर्चाचें जिकीरीचें परिश्रमाचे काम आहे व हें कार्य सरकारच्या व धनिकांच्या मदतीशिवाय सिद्धीस जाऊं शकणार नाहीं याचीही जाणीव आहे तथापि सत्य संकल्पाचा दाता श्री भगवान या उक्तीवर लेखकाचा पूर्ण विश्वास असल्यानें माझे व पर्यायानें मंडळाचे संकल्प सिद्धीला जातीलच अशी आशा आहे. जिल्हानिहाय ग्रामीण महाविद्यालयें व ग्रंथालयें झाल्यास जानपदाची बौद्धिक भूक भागविली जाणार आहे व मुंबई पुणे इत्यादि विश्वविद्यालयानें कडक बंधनात मुंबई पुणे येथेंच साठवून ठेवलेले हे विद्येचें भांडार वरील योजनेशिवाय ग्रामीणांना मिळण्याची आशा नाहीं.

म्हणींना कोणी दैनंदिन अनुभवाच्या कन्या ( Proverbs are the daughters of daily experience ) असें कोणी मानतात तर नैतिक तत्वें शिकविणारे शिक्षक ( Proverbs are patent teachers and maxims are moral demonstratiores ) असेंहि कोणी समजतात. संस्कृतांत सुभाषितांनी गाण्यांनीं युवतींच्या विभ्रमांनी ज्याचें अंत.करण द्रवत नाही त्याला पशु किंवा योगी असें संबोधिलेलें आहे. म्हणींना वाक्संप्रदाय कोशकारानीं समाजाचा आदर्श म्हणून गौरविलेले आहे, तें सर्वथैव उचितच आहे. " कोणत्याहि देशाच्या वाङ्मयात त्या राष्ट्रात प्रचलित असलेला हा वाङ्मयाचा बहुमोल ठेवा असून अत्यंत पुरातन काळापासून *परंपरागत चालत आलेली देणगी नीट जतन करून पुढील पिढींच्या*

ह्वाली करणें हें राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीचें पवित्र कर्तव्य आहे." त्यांनीं ही दिलेली सूचना लक्षांत घेतां - खानदेशांतील ही देणगी अल्पप्रमाणांत कां होईना पण ती महाराष्ट्रीय रसिकांच्या ह्वालीं करतांना मला समाधान वाटणें साहाजिक आहे.

लघुता, सुज्ञता, तीक्ष्णता व लोकप्रियता ही चांगल्या म्हणींची गमकें अहिराणी म्हणींसहि लागू पडतात. (१) आईबाई नाडनी, कानबाई घडनी (२) वायवानमा आरती (३) चावयनऽ आमपाईन, पाव्हनाले जेवन तुमपाईन (४) चावडीवर बठना नीट, घरमा नही तिखट मीठ (५) तेलीना बईल आगडोया मोडे, जाई बठना घाना जोडे, (६) देनऽ घेनऽ कूच, बोल्नऽ तेवढऽ ऊच (७) पावसा मिचुक रान सुनऽ माडी मिचुक माहेर सुनऽ कंथा मिचुक सासर सुनऽ इत्यादि म्हणी लघुता सुज्ञता तीक्ष्णता वगैरे गमकें असल्याबद्दलची साक्ष देतात.

आईबाई नाटनी कानबाई घडनी, सांस्कृतिक म्हण कानबाईचें कुलव्रत खानदेशांत असल्याबद्दलची माहिती देते; जोयी जोयी कया याही जातना निघना मोई, जातनी खावालात परायाना खाऊ नही गुयामात, देव नही देव्हारी, दिवट्या बुधल्या सवारी, बरमाई छिनाल, ते वन्हाडले काय बोल या म्हणींच्या द्वारें सामाजिक चालीरीतींचा बोध होतो.

गाव जये हनुमान बेंबी चोये ही पौराणिक घटनेची तर घरमा नरोटी आखु बाजीरावन्या गोटी ही ऐतिहासिक घटनेची जाणीव करून देतात. सांस्कृतिक सामाजिक ऐतिहासिक चाली—

रीतींचा उगम केवळ म्हणीवरूनच करतां येतो असे नाहीं तर वाक्प्रचारांच्या द्वारेंहि आपणास होतो. रोट करनऽ, मालदेव थापनऽ, शितखेडा खेळनऽ ( सांस्कृतिक ) अंधारगारूड, अधोपरी, गाधुगरी, फय भरनऽ करनी करनऽ, मानवर जानऽ, पान देनऽ (नवस फेडणें) वारा पंचायती करनऽ सतीगती करनऽ, धागरा फडकी करनऽ ( सामाजिक ) घड्याय टिरूक, जांधा म्या, मानकेशरी करनऽ ( ऐतिहासिक ), बोल घालनऽ, तेल लावनऽ, गुडाखू काढनऽ, किंवा काढनऽ ( विशिष्ट पेशावरून ) आलेले वाक्प्रचार आहेत.

सारांश म्हणींत व वाक्प्रचारांत मानवी भावनांचा स्वभावाचा खराखुरा आविष्कार सूत्ररुपानें आढळतो विशिष्ट स्वभावदोष असणाऱ्या माणसांचे डोळे उघड उघड कानउघाडणी केल्यानें कधींच उघडत नाहींत उलट अशीं माणसें चिडून जास्त उन्मार्गगामी बनतात. अशा माणसांना ताळ्यावर आणण्यास म्हणीसारखा अन्य उत्तम 'रिंगमास्तर' नाहीं. मानवांतील विशिष्ट दोषांची हिंस्त्रता न डगमगता केवळ आव दाखवून प्रसंगीं फटकारे ओढूनहि कमी करण्याचें सामर्थ्य ह्या म्हणींत आहे. ओजस्वी परंपरेचे सामर्थ्य त्यांत तर असतेच पण शिवाय त्यांमध्ये अवीट गोडीच नव्हे तर अवीट असा उपयोगहि असतो. त्यांत ज्याप्रमाणें श्रीमंताच्या अनुभवाला स्थान असतें, त्याचप्रमाणें रंकाच्या अनुभवालाहि स्थान असते. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य कुणीवळ जणूं आजहि पाराभोंवतीं बसून आपापले अनुभव चटकदार रीतीनें थोडक्यांत सांगत आहेत असा आपणास भास होतो. वाङ्मयांत जिवंत घरगुती वातावरण निर्माण करण्याचें

सामर्थ्य या म्हणींत असतें. जें वातावरण निर्माण करण्यास वाङ्मय लेखकास शेंकडों शद्ब खर्ची पाडावे लागतात, तें वातावरण, ती रम्यता, ती सहजता या म्हणींत मोजक्या शद्बांच्या द्वारें आणलेली असते. खाष्टांतल्या खाष्टांत माणसाच्या मनात प्रवेश करण्याचा सुलभ मार्ग या म्हणी होत. परदेशांत सतत कटलेट, आमलेट खाणाऱ्या हिंदवासियास वरणभाताची जी अमृततुल्य गोडी तीच दैनंदिन *जीवनाच्या धकाधकींत घरापासून दुरावणाऱ्या श्रमिकाच्या* मनास घरगुती वाक्प्रचार व म्हणींची गोडी.

म्हणी या पूर्वापार *चालत आलेल्या परंपरेच्या अभिमानी* असल्या तरी नवी परंपरा निर्माण करण्याच्या त्या मोकाहि असतात. त्यामुळें नव्या नव्या पेशांचे नवे वाक्प्रचार व नव्या म्हणीहि केव्हां केव्हां नव्या अर्थानें चपखलपणानें रुढावलेल्या आढळतात. पोस्टांतील काम करणारी व्यक्ति माहेरीं गेलेल्या पत्नी संबंधानें 'पार्सल' पाठविले असा सहजगत्या उल्लेख करते. प्रौढ शिक्षणाच्या शाळेची भोळेभाबडे ग्रामीण डंगरीशाळा या संज्ञेनें संभावना करतात. व्यापारी नवीन जन्मलेल्या मुलीस हुंडी म्हणून संबोधितो. तर कोर्टांतील कारकून नवपरिणीत वधूस स्टँप लावून पक्का झालेला दस्तऐवज संबोधतो; जीवन शिक्षणाचा पुरस्कार करणाऱ्या शिक्षकास शाळेंतीलच जोडीदारीण लाभल्यास समवाय चांगला साधला असें म्हणण्याचा मोह होतो. सारांश नवीन म्हणींचें व वाक्प्रचारांचें *स्वागत मोठ्या उत्साहानें म्हणींच्या जगांत केलें जातें.*

विनोदात गंभीर तत्त्वाचें प्रतिपादन ( कारे पाव्हना कुथस, म्हने वसन्या जागे करेना ) अश्लीलतेचा अगर ग्राम्यतेचा प्रसंगीं आसरा घेऊन स्पष्टपणें अव्यवहार्य वर्तन करणाऱ्या व्यक्तींची कानउघाडणी करण्याची हातोटी या म्हणींना ( उदा आज ब्वाऊ ( किंवा × घू ) दिवाघोले चोयी गिनूं पू ९ माजरना गू सारामा ना लिपाया ) साधलेली असते अती अभिमानाच्या पायीं स्वतःचें नुकसान करून घेणाऱ्या मानवाचा उपहास ( वाह्यनी ते वाह्यनी, मनी टेक ते न्हायनी उधळपट्टी करणाऱ्या लोकांचा तिरस्कार ( उधयमानकी, हातमा चानकी ) स्वार्थीजनाचा तिटकारा ( सून घर ग्वबरदार, उदार फिरे दारोदार ) म्हणींत व्यक्त झालेला आढळतो. अहिराणी म्हणींत फाजील दंभाचा बुरखा फाडण्याचें कौशल्य आहे, शेतकऱ्याच्या तृप्तीचे बोल आहेत. ( गहिरS पानी आबादानी ) दखS की मुरूS असा अज्ञान मुलाच्या स्वभावाचें दिग्दर्शन आहे, व नाजुक बाइना नाजुक नखरा, नवराना भर्ने सतरा चकरा असें नवपरिणतेच्या वागणुकीचें रहस्यहि उलगडलेलें आहे. इतकेंच नव्हे तर माळरान झाडे गोठा मोठ्यानींच्या पलगापाशी खेटा, घरनी असुरी यमतनासाठी रडे परायी नारीसाठी खोड चदनना फोडे अशी पतिव्रतेची रास्त तक्रारहि नोंदलेली आहे. इतिहासाची जशी पुनरावृत्ती होते असें म्हणतात त्याप्रमाणेंच ' शेंदुर सागना, मारुती उखळी आना सागात बामन जेई ग्यात न्हायी ( विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरम्। ) ये दगड पड पायवर ( स्वयंकृत अनर्थ. । ) मुसकोंडा पाटीभर चिकन चोपड

वाटोभर ( एकश्चन्द्रस्तमो हन्ति नच तारागणोऽपि च। ) या म्हणी तेव्हां आणि आतांच्या कल्पनांतील साम्य दाखविणाऱ्या आहेत. येड्याले झायी बायको माय म्हनू का बोय म्हनू या म्हणीच्या द्वारें अकल्पित लाभलेल्या वैभवानें अगर मंत्रीपदानें चढून जाऊन भलत्याच गोष्टी करणाऱ्या व्यक्तीची फटफजिती उत्तम रीतीनें करतां येईल. पूर्वीच्या गावगाड्याचीच त्यात घडणाऱ्या गोष्टीचीं वितंवातमी या म्हणी पुरवितात. उदा पाटीलनऽ घोडऽ म्हारले भूसन सडी असतांना लहान मुलाचा अकारण तिरस्कार करणाऱ्या चोखदळ बाईला मूल झाल्यावर ' बुवानीं दाढीले बाईना साडीले हा शालजोडींतला अहेर योग्य नाहीं असें कोण म्हणेल ?' रायाना भात पंगतीले म्हातारा नवरा गमतीले ही म्हण म्हातारपणीं लग्नाची हौस बाळगणाऱ्यांना जरठ हा तरुण पत्नीच्या हातातील खेळणें असतो असा बोध देते.

समाजाला, उन्मार्गगामी तरुण तरुणींना ताळ्यावर आणून रास्त कर्तव्याची जाणीव करून देण्याचें महान् कार्य या म्हणींनीं केलेलें आहे; व व्यवहारशून्याना व्यवहारदक्ष बनविण्याची पराकाष्ठा केलेली आहे. समाजात वावरताना स्वार्थी निःस्वार्थी, श्रीमंत रंक, उद्धत दलित, समव्यवसायी भिन्नव्यवसायी, आप्त परके इत्यादि व्यक्तींशी कसें वागावें याची शिकवणूक या म्हणी देतात म्हणूनच जगांतील प्रत्येक राष्ट्राच्या वाङ्मयांत म्हणींना मानाचें स्थान लाभलेलें आहे.

अहिराणी म्हणी व वाक्प्रचार या प्रमाणेंच अहिराणी उखाण्याचेंहि महत्त्व आहे व तें प्रस्तावनाकारानीं एका उखाण्याचें द्वारें प्रस्तावनेंत विशद करूनहि सांगितलेलें आहे. उखाण्यात सामान्य माणसाची बुद्धिमत्ता, कल्पकना कसाला लावलो जाते. या संबंधानें खानदेश वाग्वैभवाच्या पुढील भागात सविस्तर विवेचन करण्यात येईल.

सदर सग्रहास धुळें येथील राजवाडे संशोधन मंदिराचें माझे उत्साही संशोधक मित्र श्री. भा. र कुळकर्णी यानीं विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहून दिली त्याबद्दल मी त्याचें मन पूर्वक आभार मानतों. त्याचा सदर विषयाचा व्यासंग व अहिराणी संशोधनाचें परिश्रम 'अहिराणी भाषा व संस्कृति' या पुस्तकाच्या रूपानें महाराष्ट्रास सुपरिचितच आहे

न्यू श्रीकृष्ण प्रिंटिंग प्रेसचे जळगावचे श्री. ना. मा. तथा बुवासाहेब नेमाडे यानीं घेतलेल्या छपाईच्या तमदींबद्दल त्यांचेंहि मी आभार मानतो. म्हणींच्या संकलनाच्याकामीं ज्या विद्यार्थ्यांनीं व भगिनींनीं मला अमोल साह्य दिले त्याबद्दलचीहि कृतज्ञता या प्रसगीं मी व्यक्त करतो. शेवटीं महाराष्ट्रीय रसिक इतर पुस्तकां- प्रमाणेंच या पुस्तकासहि उदार साह्य देतील अशी आशा वाटतों. ज्या खानदेशी भाषा मंडळाच्या प्रेरणेनें ही संशोधनाची पणती तेवत आहे त्या मंडळाचा तर मी निरंतर ऋणी आहे.

दा. गो. घोंग्से

# खानदेश वाग्वैभव



## अरे मना सुशना, माले कोनी पुसेना.

एखाद्याला आपल्या वैभवशाली ऐश्वर्यवान वा मोठ्या अधिकारावर असलेल्या नातेवाईकाचा मोठा अभिमान वाटत असतो. तथापि त्या नातेवाईकाला या माणसाविषयीं मुळींच आस्था वाटत नाहीं. अशा वेळेस तिऱ्हाईत मनुष्य त्याला सरळ वस्तुस्थिति समजावून देतो. नातेवाईकांचा अभिमान व्यर्थ बाळगणाऱ्याचा व निष्कारण ह्या भाऊबंदावर ढोल पिटविणाराचा उपहास करण्यासाठी ही म्हण योजितात.

## अंगाथिन शेंगा, दाय करशी सोंगा.

एखाद्या सडपातळ माणसानें जर लठ्ठ स्त्रीशीं लग्न करण्याचें ठरविलें, तर जगांत तो एक उपहासाचा विषय होईल. आपल्या अंगीं असलेल्या कुवतीच्या बाहेर अतिशय कठीण काम एखाद्यानें पत्करलें तर त्याचीहि जगांत वरीलप्रमाणेंच फजीती होत असते

## अमांड राडले कुजात यार, ती करे फुनफुन द्यानी दिसा दार.

'समसमा संयोग कीं जाहला' या अर्थी ही म्हण वापरतात. मात्र रत्नं रत्नेन संगच्छते असा चांगला अर्थ यातून निघत नसून वाईटाच्या संगतीला वाईट असेल तर त्याचे फळहि वाईटच असायचे अशा अर्थी ही म्हण वापरतात. एखाद्या [illegible] खास हलक्या कुळातील व वृत्तीनेंही हलकट नवरा मिळाला तर तिच्या साऱ्या कुरकुरीसाठींहि तिला मार खावा लागतो. वाईट माणसांची खोड वाईट माणसाकडूनच चांगली मोडली जाते.

आईजीना जीवावर बाईजी उदार, सासूना जीवावर जवाई उदार.

आईच्या जीवावर मुलगी हौस करते व सासूच्या आश्रयामुळें जावई चैन करतो. हलवायाच्या घरावर तुलशीपत्र अशा अर्थाची ही म्हण आहे.

आडनाईनी दिधी भर, उठने घली नवरा कर.

शेजारणीच्या सांगण्यावरून म्हाताऱ्या स्त्रीनें नवरा केल्यास फजिती होते दुसऱ्याच्या सांगण्याचा सारासार विचार करून नंतर आपला विचार पक्का करावा. नाहीतर फजिती होते.

अंगमा दोन कुडच्यां, घरमा नहीं विलट ( मिठ ) मिरच्या.

अंगात दोन शर्ट परतु घरात संसारोपयोगी नित्याच्या वस्तुहि नाहींत. बढाईखोर माणसाची हेटाळणी करण्याच्या उद्देशानें ही म्हण अस्तित्वात आली.

मावशी पुऱ्या, सनी घुगऱ्या.

आमावस्येचा दिवस हा सणाचा दिवस म्हणून कोणी मानीत नाहीं अशा वेळीं पुऱ्या करून खाणाऱ्या व सणाच्या दिवशीं कदान्न खाणाऱ्या माणसाचा उपहास होतो. अवेळीं भलतेंच काम करणाऱ्या किंवा अवेळीं खर्च करणाऱ्या पण खऱ्या गरजेच्या वेळीं हात राखून खर्च करणाऱ्या माणसाला उद्देशून ह्या म्हणीचा उपयोग करतात

आनयागंधक, पन बोलानी ठसक.

अनभिज्ञ अडाणी माणसाला बोलण्याचा तारतंत्र नसतो.

आईबाप करे जोर बायकापुढऽ जसा मोर. बाईलबुद्धि मनुष्य हा आपल्या आई वडिलांची अवहेलना करतो; व त्यांना आपल्यापुढें वाकवितो. परंतु त्याचे त्याच्या बायकोपुढें कांहीं एक चालत नाहीं इतकेंच नव्हे तर मोर जसा नाचतो, तसा तो तिच्या शब्दामुळें तिला खूष करण्यासाठीं पुढें पुढें करतो. अशा गृहस्थानें आई बापाविषयीं योग्य कर्तव्य करावें यासाठीं हा इशारा दिलेला आहे. याच अर्थी 'अईबापले हिसकिस बायकोले किसमिस' ही म्हण वापरतात. यात त्याचे आईबाप अन्नालाहि महाग पण बायकोला मात्र किसमिसाचा खुराक तो देत असतो असा अर्थ झालेला आहे.

आईना धस ना बाईना धस, माटी उडे फसाफस,

घरांत आईचा किंवा अन्य कोणत्याहि वडिलधाऱ्या माणसांचा धाक नसल्यानें घराला शेण न लागल्यानें मातीच माती झालेली आहे. अर्थात निष्काळजीपणामुळें जिकडे तिकडे अव्यवस्था दिसते. ज्या बाईला कोणाचाहि धाक नसतो अशा बाईच्या घरीं दिसून येते. निष्काळजी, स्वैर व कोणाहि चांगल्या व्यक्तीचें नियंत्रण न मानणाऱ्या व्यक्तीच्या अव्यवस्थेला उद्देशून ही म्हण वापरतात.

अंबानी कमाई, निंबूमा गमाई.

एखाद्या व्यवहारांत झालेला फायदा दुसऱ्या व्यापारांत गमाविणें. शेवटीं आहे तीच स्थिति कायम राहणें. या सारख्याच 'आजला मरी गया, नातू झाया' अगर 'हागन नीं घर राखनऽ हा म्हणी आहेत.

आयत्या घमम्, नागोबा.

आयत्या बिळांत नागोबा हा वरील म्हणीचा शब्दशः अर्थ आहे. एखाद्यानें कष्ट करून पैसा कमावला व एखाद्यास तो विनायास लाभला तर या म्हणीच्या द्वारें त्याच्या वस्तुस्थितीची जाणीव करून देता येईल.

आधला पडी गानामा, नकटा उना मइदानमा.

गुणवान मनुष्याच्या गुणाची खरी पारख जग क्वचित करीत नसते. उलट त्याची वेळोवेळीं पायमल्ली होत असते. परंतु दुर्गुणी माणसेंहि जगात मान सन्मान पावतात. ज्याप्रमाणें एखादे व्यवहारांत चालू असलेले दिडकी सारखे नाणें कोनाड्यात अगर देवघरांत कुठें पडून राहते व खोटेनाणें वारंवार मैदानात उजड्यावर येते, तशीच गुणवान माणसाची स्थिति होत असते. आपल्याकडे 'बी' कवीचें उदाहरण सर्वश्रुतच आहे. मासिकातून लुंग्यासुंग्या कवींचा उदोउदो होत असताना आतापर्यंत बी सारख्या ख्यातनाम कवीला लोक विसरून गेले होते. " उकिरड्यात चिंतामणी, गळ्यात काचमणी " अशीच ही स्थिति आहे.

आपलऽ व्हई, ते कय येई.

आपल्या रक्तामांसाचे जे खरे नातेवाइक असतील त्यानाच आपल्या विषयीं सहानुभूति वाटते. ' या बोटना वेदना या बोटले ठाउक ' अशी दुसरी स्दश म्हण आहे

आभंड रांड कुंभाड करे, गरिब दाद्यावर सैतान करे,

एखाद्याची पत्नी चण्डिका ( रागीट ) असेल तर ती नाना-

तऱ्हेचा अत्याचार करून नवऱ्याला सळो की पळो करून सोडते. बंडखोर बायको कुभांड रचून गरिब नवऱ्यावर जुलुम करते, असा या म्हणीचा शब्दशः अर्थ आहे. गरीब माणसास कोणीहि सतावतात.

**आंधया म्हने हाग लागनी, बहिरा म्हने आग लागनी.**

आंधळा म्हणतो हाग लागली बहिरा म्हणतो आग लागली. दोन अडाणी माणसांची या भिन्न व्यंग असलेल्या माणसांची जोडी की एकाचा मनोदय दुसऱ्यास कळत नाही. तो पहिल्या माणसाने उद्गारलेल्या वाक्यांचा अर्थ भलताच करतो. व आपली फजिती करून घेतो.

**आभूटमा याय कयत नही, आयसेल बाई दयत नही.**

ढग आले असतांना वेळ कळत नाही. आळशी बाईचे दळणहि पुरे होत नाही. कोणतीहि गोष्ट रेंगाळत चालली असतांना या म्हणीचा उपयोग केला जातो.

**आइबाई नाडनी, कानबाई घडनी.**

दुसऱ्या गरीब बायाबापड्यांकडून शिवा घेऊन कानबाईचा उत्सव साजरा केला. हरबायाच्या घरावर तुळशी पत्र अशी सदृश म्हण आहे. दुसऱ्यांना कोणी त्रास देऊन पैसे उकळून चैन करीत असल्यास त्याला उद्देशून ही म्हण योजतात.

**आंधया दये, कुत्रा पीठ खाये.**

आंधळे दळते, कुत्रे पीठ खाते.

**आयघी राजा, रोडगा ताजा.**

ऐदी माणसाला काम नकोसे असतें; पण ताजे जेवण मात्र वेळेवर हवें असतें.

**आईतमान्या, तन अगर थांट शिनगाऱ्या.**

ऐदी मनुष्य स्वतःच्या शरीर शृंगाराकडेच् लक्ष पुरवितो व तोहि साज दुसऱ्यांनी आणून द्यावा अशी त्याची अपेक्षा असते

**आपलाच दात आपलाच व्हट, कोनले सांगू गुपित गोट.**

घरातल्या माणसांनी अन्याय करण्यास सुरवात केल्यानंतर बाहेर सांगण्याची सोय नाहीं.

अडताले जुपनऽ— महत्त्वाच्या कामात मग्न असणें.

**आवकया किंवा अवकया करनऽ**

काकुळीत करणे, गयावया करणे. आकरीतनऽ लेनऽ फुकट घेणें· जागड घेणें. हाऊ नागर आकरीतना धिदा.

**आपलाच दात आपलाच व्हट, बोलतांना चुरकत.**

आपलेच दांत आपलेच ओठ कुठे बोलण्याची सोय नाहीं. घरांतल्याच माणसांनी घरांतल्या माणसावर अन्याय केला असतांना दाद तरी कोणकडे मागावी हें गृहच्छिद्र असल्यानें कोणाजवळ सागता येत नाहीं.

**आवडतीले सांडोचोयी, नावडतीले शिईगाई.**

आवडत्या माणसाचे जास्त लाड पुरविले जातात व नावडत्या माणसाचा तिरस्कार वृद्धिंगत होत जातो.

**आडा दांडू घालनऽ**

अडचन उभी करणें, विरोध करणें. मार्गात खोंड उभा करणें

मी त डाकनाळे बटवायळे जात व्हतु त्यानऽ भूतनऽ दरवाडो भेद आडा दांडू घ तना ! मी डॉक्टरला बोलविण्यास जात होतो, पण त्यानें भुताचें भय दाखवून माझ्या मार्गात धोंड उभी केली.

**आडा तिडा पोसना, घल्डी उखलेना स्थूलदेही मनुष्याकडून**

लहान धागरही उचलली जात नाही

**आंबा खादा म्हारानी, ब्रामन मरी ग्या मारानी.**

आंबे महारानें खाल्ले आणि मार सज्जन ब्राह्मणास मिळाला. चोर सोडून संन्याशाला सुळी.

**आवघड जागे दूख जवाई डाक्तर किंवा सासुबाईंना थानाले दूख, आलु जवाई डाक्तर**

कांही आप्तस्वकीयासमोर संकोच वाटत असतो, तथापि त्यांच्यासमोर नाइलाजानें हा संकोच काढून टाकण्यासारखी परिस्थिति निर्माण होते. सासूच्या स्तनाला दुःख असल्यानें व जावई डॉक्टर असल्यानें दुःख निवारणार्थ संकोच बाजूला सारूनहि जावयास सासूचे ऑपरेशन करावे लागते. सारांश प्रसंगी संकोच शिष्टाचार बाजूला सारावे लागतात.

**आड हीर करनऽ**

जीव देणें, आड विहिरींत जीव देणें.

**आवड भरनऽ**

वाफा पाण्यानें भरणें.

**आरऽ म्हननऽ**

दणकारणें, धमकावणें.

**इनमीन साडातीन.**

हे मिळून तरी किती होणार अवघे साडेतीन. नवरा बायको मुलगा मुलगी (लहान) धरून साडेतीन माणसे. अल्प गोष्ट अगर पदार्थ या अर्थी.

**इडा पिडा जावो, बळीचें राज येवो.**

ही एकदाची पिडा टळून बळी राजासारखें वैभव तुला प्राप्त होवो. बळी हा अनार्य असूनहि अत्यंत गुणवान व वैभवशाली उदार राजा होऊन गेला. श्री वामनानें त्रिपादभूमि मागून त्याला पाताळांत घातले. मुलांना आशिर्वाद देतांना या म्हणीचा उपयोग वडिल माणसें करतात.

**इस मोडवा, पन धा नहीं मोड्**

वीस मोडावे पण दहा मोडू नये! योग्य वेळेला एखादें काम कमी खर्चात व कमी त्रासांत होऊं शकतें. पण ती वेळ गेल्यानंतर त्या करिता दुप्पट खर्च व त्रास पडतो. योग्य वेळेला खर्च केला असतांना फायद्याचें होईल हें सांगण्यासाठीं त्या म्हणीचा उपयोग करतात. कांही वेळेस 'तीस मोडवा पन ईस मोड् नहि' अशीहि म्हण वापरतात. अदूरदर्शी माणसाला उद्देशून ही म्हण आहे.

**इकोपी जानऽ** मरतेंच पर्यवसान होणें. अत्यंत वाईटदशेस जाणें. त्यानऽ दुखनऽ इकोपी गयऽ

**उखल पतरावय म्हने जेवनार कितला छेतस.**

उचल पत्रावळी म्हणे जेवणार किती आहेत!

एखादा मनुष्य अगर नोकर हा सांगितलेल्या कामा व्यतिरिक्त जास्त अवांतर चिकित्सा अगर विचार पूस करूं लागला, तर त्याला

त्याची अवास्तव चिकित्सावृत्ति दाखण्यासाठी ह्या म्हणीचा उपयोग करतात. मनुष्यानें जितके सांगितले तितकेंच काम करावें फार पंचायतीं करु नये, असा या म्हणीचा अर्थ आहे.

**आग लाऊ तमासा पाहू.**

दुसऱ्याच्या घरीं भांडण लावून दुरून गमत पाहणारे लोक या जगांत कांहीं कमी नसतात.

**आज खाऊ ( किंवा × वूं ), दिवाळीले चोळी शिवू—**

आज खाऊन घेऊ व दिवाळीला चोळी शिवू. खाऊ ऐवजीं मैथुनार्थी दुसराहि ग्राम्य शब्द प्रचारांत आहे. आज एखादीशीं संग करावयाचा व दिवाळीला त्या स्त्रीला चोळी शिवून देण्याचा वायदा करावयाचा असा त्या म्हणीचा अर्थ होतो. कोणतीहि गोष्ट वेळेवरच व्हावयास पाहिजे. व्यवहारांत काम केल्याबरोबर दाम चुकविणें इष्ट असतें. दीर्घकालीन वायदा काय कामाचा?

**उठाठेवा, बोडखावर दिवा.**

अकारण उठाठेव करून भलतीच जोखीम अंगावर घेणें लचाडी माणसें किंवा निष्कारण लुडबुड करणारी माणसें भलतीच जबाबदारी स्वीकारून संकटाच्या खोऱ्यांत सापडतात.

**उनऽ उतरी, चुल्हामा मुतरी.**

आपण हसे लोकाला, शेंबूड आपल्या नाकाला. दुसऱ्यांतील न्यून शोधणाऱ्याच्या ठिकाणींहि कांहीं तरी न्यून असतेंच.

**उतावया नवरदेव, गुडघाले बाशिंग!**

नवरदेव लग्नासाठीं कितीहि उतावळा झाला तरी गुडघ्याला बाशिंग बांधून कसें चालेल? पण उतावळा नवरा लग्नासाठीं इतका

हपापलेला असतो की, तो डोक्याला काशिन बांधण्याऐवजी गुडघ्याला काशिन बांधतो. अनि उत्सुकतेच्या भरात भलती गोष्ट करूं नये हे सांगण्यासाठीं या म्हणीचा उपयोग करतात.

### उधारनं पोतं, हातभर रित

जो वाणी उधार माल देतो त्याचे पोतें हातभर रिकामे असते. जो वाणी रोख पैसे घेऊन माल देतो त्याची विक्री उधार देणाऱ्यापेक्षा कमी असते व मालहि कमी संपतो पण त्यांत त्याचे अंतिम हित असते. उधार देणाऱ्याच्या मालाचा खूप उठाव झालेला असला तरी गल्ला मात्र रिकामा राहतो. व असला व्यापार व्यापाऱ्यांच्या दृष्टीनें निकेस लावणारा आहे.

### उनी पाव्हनी मेटाके, लावनी समार वाटाले.

पाहुणी बिचारी भेटावयास आली. पण घरधनिणीनें तिला भाजीचा मसाला वाटून तयार करण्याचें काम दिले, पाहुणीच्या सोशिक व कष्टाळू स्वभावाचा फायदा घरधनिणीनें अशा रीतीनें घेतला. संधीसाधू, स्वार्थ साधू माणसें शिष्टाचार पाळीत नाहींत या अर्थी ही म्हण आहे.

### उरवर अरसोय ( उरावर अरसूळ )

निष्कारण ओझे. घरात स्वच्छंदीपणानें वर्तन करणाऱ्या व न कमावणाऱ्या व्यक्तीस उद्देशून योजतात.

### उठ बैस, पानीमा म्हैस.

म्हशीचे खरे मोल ती पाण्यात असताना करता येत नाहीं. पाण्यात म्हैस असून मोल ठरविण्याची यातायात करणें इष्ट नाहीं.

कोणताहि गोष्ट प्रत्यक्ष हजर असतांनाच त्या गोष्टीविषयीं विचार विनिमय करणें हें बरें दाखवून देण्यासाठीं वरील दाखला देण्यांत येतो.

**टीप—** याच अर्थी ' पानीमा म्हईस बामन बामनीनछे मारस '

**एका** ब्राम्हण दांपत्याचा म्हैस घेण्याचा विचार ठरला. व या म्हशीचे दूध काढल्यानंतर त्या दुधापैकीं कांहीं दुधाचे दही ताक करण्याचा मनसुबा त्यांनीं ठरविला. या विचार विनिमयात ब्राम्हण स्त्रीनें आपल्या उपयोगी पडणान्या शेजारणीस हें बनविलेलें ताक देण्याचा मनोदय जाहीर केला. तथापि हा विचार अर्थातच ब्राम्हणास पसंत पडला नाहीं. त्याचें या मुद्यावरून भांडण जुंपलें. व शेवटीं ब्राम्हण आपल्या स्त्रीस मारूं लागला. शेजारीपाजारी जमा झाले व त्यांना खरी गोष्ट कळल्यावर त्यांनीं दोघांनाहि दोष दिला.

### उंदीरना जीव जास, मांजर म्हनस वातड लागस.

उंदराचा जीव जातो खाणार म्हणते वातड लागते. एखादा श्रीमंत अगर अधिकान्याच्या सोयींसाठीं मजूर माणसे गरिबांच्या जिवांवर खुशाल चेंडूप्रमाणें मजा मारीत असतात. अशा वेळेस या म्हणीचा उपयोग करतात.

### ऊय खाई धूय, कजानं मूय.

कारण नसता भांडण होणें, अशा अर्थी या म्हणीचा उपयोग करतात.

### उरोख्याले पुरोटा !

अगोदरच बरेच अन्न शिल्लक उरले असतानाहि अणखी अन्नाचा पुरवठा दुसरीकडून होणें असा याचा अर्थ आहे.

अनिष्ट गोष्टीला उचलून धरणारे भरपूर लोक असतांना, आणखीहि नविन माणसे त्या ठिकाणीं साथ द्यावयास आली असतांना या म्हणीचा उपयोग करतात.

**उड उडउडना, तोंड घशी पडना.**

उड उड उडाला व तोंड घशी पडला. बढाईखोर मनुष्य निष्कारण बढाया खूप मारतो पण शेवटीं तोंडघशीं पडतो.

**उठव तिनदां, तोच धंदा.**

दररोजच्या करीत असलेल्या त्याच त्याच कामाचा कंटाळा येतो हा तिरस्कार व्यक्त करण्यासाठीं, या म्हणीचा उपयोग करतात.

**उदारना वढना पारी, गांड देस गाजरावन्धी.**

संसारांत अति उदारपणा हा देखील दुर्गुण ठरतो. उदार चव्हाट्यावरील पारावर बसून फक्त गाजरें घेऊन तनुविक्रय करतो. असा याचा अर्थ होतो.

**उजी का डाई !**

काम फत्ते झालें का अयशस्वी झाले !

**उसना कोम, दारासी बोम.**

उसनवारी करणें अनिष्टच कारण उसनवारी करून आणलेली वस्तु नीट नसते. उसनवारी करून आणलेले बी शेतांत पेरल्यामुळें पीक निघूं शकत नाहीं.

**उधय मानकी, हातमा चानकी.**

खर्चिक स्त्रीच्या हातांत पैसा अगर घरांत असणारें साहित्य शिल्लक रहात नाहीं. गरजेच्या वेळेपुरतेंहि सामान राखून ठेवीत नाहीं. तिच्याजवळ लहान भाकरीखेरीज कांहीं शिल्लक रहात नाहीं,

उघड्या शेजारी नागडा गया ऽ सारी रात हिव मझार मरी गया अगर हिवनी रातले मरी मया.

गरजवंताबवळ दुसरा गरजू मनुष्य गेला व संगतीत राहिला तर दोघांचाहि कांहीं फायदा होत नाहीं. सारख्याले वारकऽ अशी सदृश म्हण आहे.

उठता लात बसता बुकी.

कोडग्या अंगचुकारपणें काम करणाऱ्या माणसाला वारंवार मार द्यावा लागतो. म्हणजे काम व्यवस्थित पार पडतें.

एक धयडी काम करे सातजन तिनऽ कमर धरे.

एकाद्यास ल्हानसें काम करावयास दिलें असतांनाहि तो मनुष्य त्या कामाच्या पूर्ततेसाठीं अनेकांची मदत घेतो.

एक म्हातारी काम करते व ती काम करते, तिला शीण पडूं नये म्हणून सात माणसें तिचे वांकलेले कमर उचलून धरतात अशा म्हणीचा शब्दशः अर्थ.

एक पाट तीन ठिकानी करनऽ

पुढें पुढें करणें. डामडौलात ठेवणें.

एक तीय सात जनेरनी वाटी खावा.

एक तीळ सात लोकांनी वाटून खावयास पाहिजे.

एक गोधडी, सतरा वऱ्हाडी.

अल्प गोष्ट सर्वांना कशी पुरणार या अर्थी लग्नाला आलेल्या सतरा वराड्यांना एक गोधडी पाघरण्यास कशी उपयोगी येणार

**एक गोधडी सतरा वऱ्हाडी:—**

सामग्री थोडी असतांना माणसें फार गोळाविली गेली त्यांना हें साहित्य कसें पुरणार?

**एक देव केशवा, एक नाम केशवा.**

एकच कोणती ती गोष्ट पक्की सिद्धीस नेण्याचा प्रयत्न करणें. एकच कोणता तरी धंदा स्वीकारणें.

**एरंडले किती वी पानी घालऽ ते ऊसनी स देई का त्याले?**

एरंडाला कितीही पाणी घातले तरी त्याचें उसांत रुपांतर होणार नाहीं व उंसाची गोडी येणार नाहीं. वाईट माणसावर कितीही उपकार केले तरी तो सज्जन बनत नाही.

**एक पुती रडे, सात पुती रडे.**

ज्याच्या जवळ कमी संपत्ति अगर वस्तु असते तोहि संपत्ति नाही असें म्हणतो व ज्याच्या जवळ विपुल संपत्ति अगर वस्तु असतात तोही संपत्ति अगर वस्तु नाहीं, असे म्हणतो. एक मुलगा असलेली आई कमी मुले म्हणून रडते तर सात मुले असलेली आईहि कमी मुले आहेत म्हणून रडते.

**एक दाळिची, नव मन पानी.**

तुरीच्या वरणांत दाळीचा एकच दाणा असावयाचा पण पाणी मात्र नऊ मण घालावयाचे! कोणी मुख्य आवश्यक गोष्टींची कमतरता ठेऊन फाफट पसाराच खूप करीत असेल तर त्याला इशारा

देण्यासाठीं अगर हिणविण्यासाठीं ह्या म्हणीचा उपयोग करतात. याच अर्थाची खालील म्हण आहे.

**एक माथा, हांडीभर रसा.**

एक नहीं धड भाराभर चिंध्याः– एकही चांगले वस्त्र नाहीं. सर्वच चिरगुटांचा पसारा! जवळ असलेल्या वस्तूंपैकीं एकाहि उपयोगाची नसतांना किंवा आप्तेष्टांपैकीं एकही कामाचे नसतांना ही म्हण योजतात.

**कडू कारला तूपमा तयात साकरमा घुसयनात तरी त्या कडूच व्हायनात.** कडू कारलें तुपांत तळलें साखरेंत घोळलें तरी तें कडूच. वाईट वृत्तीच्या माणसावर कितीहि उपकार केले व त्याच्याशीं कितीहि गोड बोलली तरी तो आपल्या अधम वृत्तीचें प्रदर्शन केल्याशिवाय रहात नाहीं.

**कडेवर पोर जीवले ( गावले ) घोर.**

१ मुलगा कडेवर असूनहि मुलगा चुकला असा डांगोरा करून जिवाला ( गांवाला ) निष्कारण 'घोर' काळजी लावणाऱ्या बाईवरून ही म्हण प्रचारांत आली. एखादी वस्तू जवळ असूनहि सांपडत नाहीं म्हणून सर्वत्र शोधण्यासाठीं घर डोक्यावर घेणें असा अर्थ होतो. 'गयांमा सरी गांवाले फेरी.' किंवा पिटांखाल अरी, चम्हार पोरले मारी' या सदृश अर्थाच्या म्हणी आहेत.

**करनऽ नां सवरनऽ फोकट धिंगानऽः–**

कांहींहि काम करावयाचें नाही; मात्र उगीचच कामाच्या नांवाखालीं गोंधळ माजवावयाचा.

**करवा तसऽ भरवा, बोलवा तसऽ वागवाः—**

करावें तसें भरावें बोलावें तसें वागावें.

**करमनी कथा, जीवले यथा.**

दररोजची कर्मकहाणी सांगतांना जिवाला यातना मात्र होतात.

**कराले गई काइ आखु व्हई गे काईः—**

एकादी गोष्ट करावयास हातीं घेतली असतांना ध्यानीं मनीं नसतांना दुसरेंच लचांड उद्‌भवतें अशा वेळेस ही म्हण वापरतात. पुढील सदृश म्हणी आहेत.

**कराल गई पन तंगड्या उनात वर.**

**कराले गऊ एक पन झायऽ माले दूक.**

**कयत नही वयत नही भाजी भाकर खात नही.**

कळत नाही वळत नाही भाजी भाकर खात नाही. कोणत्याहि गोष्टीचें गम्य नसतांनाहि लुडबूड करणाऱ्या माणसाला उद्देशून ही म्हण वापतत

**कयना कोंडा जलमना तूपमांडा घडीनाः—**

कळण्याची भाकर अर्थात साधें अन्न खाण्याची संवय नेहमीं असलेली चांगली. तूपमांडा कांहीं दररोज खातां येत नाहीं. माणसाला कोणतीहि संवय, गोष्ट जन्मभर निभेल अशीच असावी.

**कयेना वये चालना धुये, पइसाना केया गटागट गियेः—**

मंदबुद्धि धुळयाला चालला आणि अत्राशीपणानें एक पैशाची केळीं खाऊं लागला. धुळे हें जिल्ह्याचें ठिकाण त्या ठिकाणीं जाणारा

मनुष्य चलाख असावयास पाहिजे. बावळट मनुष्य तेथें गेल्यावर आपल्या मंदबुद्धीचें प्रदर्शन करतो. पूर्वी एक पैशाला धुळ्याला केळीं खूप मिळत असत. तीं स्वस्त जरी असलीं तरी अति खाल्ल्यास केव्हांहि डाचणारच.

**करी करी भागना, देव पुंजाले लागनां:—**

करून करून भागली व देवपुजेला लागली. एखादी छिनाल स्त्री व्यभिचार या पापकर्म करून थकून जाऊन शेवटीं देवपूजा वगैरे पुण्यकर्म करूं लागली असतांना तिचा उपहास करण्याच्या इरायानें ही म्हण वापरतात. एकाद्या व्यसनाधीन मनुष्यानें आपण व्यसनहीन आहोत असा साळसूद पणाचा आव आणला असतांना ही म्हण वापरतात.

**कसाना साधू, जग भोंदू:—**

तो साधू कसचा जगाला नाडणारा असा ढोंगी मनुष्य आहे.

**कसानऽ लेकरू, अजात शिंगरू:—**

तो मुलगा नाहीं खोड्या असणाऱ्या तट्टाप्रमाणें द्वाड आहे.

**काना कयपती, आंधया हिकमती:—**

चकणा मनुष्य कलह लावण्यांत पटाईत असतो. व आंधळा मनुष्य मोठा युक्तिबाज असतो.

**कारी नाव डारी, नाव ठेये ती नारी:—**

एखाद्यानें एखादे वेळेस जरी चोरी केली तरी त्याचें कायमचें नांव बद्दू होते. विशेषतः अशा चोर स्त्रीविषयीं स्त्रिया सहानुभूति

दाखवीत नाहीं. म्हणूनच जी नाव ठेवते, खोड काढते ती नारी अशी व्याख्या या म्हणींत केलेली आहे.

कागदमा मेय, हातमा केयः—
तथ्यांश मात्र कांहीं नाहीं. केवळ कागदी जमाखर्च बरोबर.

काम नही ते काय करू, नया लुगडा दांडे करूः—
काम नाहीं तर काय करावे ! नवे लुगड्यास दांडा मरू या.

रिकामा न्हावी भिंतीला तुंबड्या लावी या म्हणीच्या सदृश ही म्हण आहे.

काशी कयी पन मांजर मारनी हाइ कोठ सांगसः—
मनुष्य चांगल्या गोष्टींची बढाई मारतो, पण वाईट गोष्टींचा उच्चारहि करीत नाहीं.

काम ना धंदा खावा ना चेंदाः—
काम धंदा झाल्यावर खाणें पिणें जास्त सुचेंन. ' काम ना धंदा तिनदाव चेंदा ' अशीहि म्हण आहे.

काम नही कवडीनऽ रिकामपण नही घडीनऽ
महत्वाचे काम तर कहीं होत नाहीं मात्र, रिकामपणहि सटरफटर क्षुल्लक कामामुळें होत नाहीं.

कश्याले झायऽ उडाले फांदीले झायऽ मुडालेः—
कावळ्याला झाले उडायला फादीला झाले मोडायला, संस्कृत मध्यें यालाच काकतालीय न्याय असें म्हणतात.

कुजात रांडथीन रांडका बरा, सोडीना ( किंवा भाडाना ) येईल थीन व्हंडका बराः—

वाईट बायको करण्यापेक्षां विधुरावस्था बरी. खोड असलेल्या व काम न करणाऱ्या बैलापेक्षां शिंगे नसलेला बैल बरा. क्षणिक फायद्यासाठीं कायमची वाईट गोष्ट पत्करून निकृष्ट श्राद्ध घेण्यापेक्षां ती गोष्ट न स्वीकारणेंच श्रेयस्कर असतें.

कुम्हारथीन गधडऽ शानऽः—

कुंभारापेक्षां गाढव कां जास्त शहाणे असते ? वडील माणसाना धाकटी माणसें उपदेश सांगू लागला तर वडील माणसांना ती गोष्ट रुचत नाही; व अशारीतीनें ते धाकट्याचे कान उपटतात.

कुम्हारनऽ गधडऽ गयऽ उखल्ड्या फुकायले:—

कुंभाराचे गाढव कोठें ! अर्थात ते उकिरड्यावर आढळणार. मराठी सदृश म्हण चुकलेला फकीर सांपडतो मशीद माणसांस एखवा गोष्टीची चटक लागली तर तो मनुष्य अशा गोष्टी ज्या ठिकाणीं असतात त्या ठिकाणीं घोटाळत असलेला दिसतो.

कुथस का रे पाव्हना, बसल्या जागे करमेना:—

अव्यापारेषु व्यापार ! एक पाव्हणा कुंथत असलेला पाहून घरधन्यानें विचारले का रे बाबा कुंथतोस ! बसल्या जागीं मला करमत नाहीं म्हणून मी कुंथत आहे. असें पाव्हण्यानें घरधन्यास उत्तर दिले. रिकामटेकडी माणसें वेळ जात नाहीं म्हणून अनुपयुक्त भलतीच कामें करीत असतात.

कुरकुर कर बाई कुरकुर कर पाव्हना बनु मी तुनाच घर.—

बाई, मी आल्याबद्दल तुम्ही खुशाल कुरकुर करा, पण मी

तुमच्याच घरीं पाहुणा आलों आहे. निर्लज्ज सदा सुखी, असा या म्हणीचा अर्थ.

कोल्डी मोल्डी टेक धोतरकडे देख !:--

हातांत पैसा नसतांना छानछोकीनें राहणाऱ्या माणसाला उद्देशून ही म्हण वापरतात. फुकट ऐट ! पांढऱ्या शुभ्र त्याच्या धोत राकडे फक्त पहा ! असा या म्हणीचा अर्थ होतो.

कारुनारी पोटभरी पाटील बुवानी रिकामी ढेरी : —

एखाद्याच्या जिवावर लुंगीसुंगी माणसें मौज करतात आणि त्यांचा पोशिंदा मात्र उपाशी.

कायी गाय काटा पेटा चेंदी जाय अंन पानीले देखी बिचकी जाय:—

काळी गाय काट्यांतून जातांना बिचकळी नाहीं, आणि पाण्याला पाहून मात्र बिचकते. ज्या संकटांत अगर अडचणींना वास्तविक माणसानें म्यावयास पाहिजे त्या संकटांत उडी घेऊन मनुष्य लीलया पार पडतो. मात्र क्षुल्लक संकटाला वास्तविक जग- ह्ष्टया ते संकट नसतेंच अशा संकटाला तो भिऊन तें काम कर- ण्याची टाळाटाळ करतो.

खयराती वांगर, हातमा नागरः—

जो स्वैरवर्तनी असतो व विद्या शिकत नाहीं त्याच्या हातीं शेवटीं नांगर असतो. त्याला शेवटीं शारीरिक कष्टानीं कामें करावी लागतात.

खगारा खाजम, नगारा वाजंस --

वाह्यात्कारीचा सरजामी डामडौल मात्र उरला. पूर्वीची सुस्थिति जाऊन हीन दशा प्राप्त झाली.

खानऽ पिनऽ तिनदा, कामले कारे गांदा ?

खाणें पिणें व्यवस्थित असूनहि कामात अघोरपणा काय कामाचा ?

खानऽ ना पिनऽ फोकट धिंगानऽ---

काहीं खावयाचें नाहीं, प्यावयाचे नाहीं, निष्कारण गोंधळ मात्र करावयाचा. ज्या ठिकाणीं काहीं काम नाहीं तेथें लुडबूड करून गोंधळ माजवावयाचा.

खास तीन, दिखस कयाहीन --

तिनदा खाऊनहि तोंडावर तजेला नाहीं.

खास शिरापुरी, पोट शंभू डेरीः--

रोज शिरापुरी— गोड गोड पक्वान्न खाण्यानें पोटाचा नगारा बनणें. अति सर्वत्र वर्जयेत् सदरा म्हण. खाय गारी, पोट शंभु डेरी.

खाय गारी हाग दारी -

- पचत नसतांनाहि खावयाचे भरपूर आणि पसाराकडेस हि सारखे जात रहावयाचे. उधळीं माणसें खाण्यापिण्यात पैसे उडवितात व शिल्लक मात्र कांहीं ठेवीत नाहीत.

खिसामा नहीं, नि मनसा व्हईः--

खिशांत पैसे नसतानाहि चैन करण्याची अगर पदार्थ विकत घेण्याची इच्छा उत्पन्न झाली. हिंदी सदरा-हौम बडी खर्ची थोडी.

खीर खावाले मी, कामले तु मीः--

स्वार्थाच्या वेळी मी हजर, ऐन कामाच्या वेळी मात्र गैरहजर. जबाबदारीची कामें इतरांनीं पार पाडावीत ही अपेक्षा. 'खीर खावाले तुमी कामाले मी' अशीहि म्हण वापरतात.

खयखन खेये, सवसार जयेः--

दुष्ट स्त्रीला दुसऱ्याचा संसार जाळण्यांत उधळून देण्यांत मौज वाटते. मराठी सदृश म्हण — उंदराचा जीव जातो खाणारा म्हणतो वातड लागते.

खोपडी उल्टी, सवसार निपटीः--

एखाद्याचें डोकें फिरलें म्हणजे त्याच्या संसाराची धूळधाण होते. अव्यवहारी माणसाच्या संसाराची दुर्दशा होते.

गुजर गाडीना, निवद शेंगोयीनाः--

हमरस्त्यावरून देवाचा रथ मिरवीत न्यावा, आणि देवास नैवेद्य मात्र कुळदाच्या पिठाच्या केलेल्या शिंगाकृति पदार्थाचा असावा. कोणतीहि गोष्ट शोभून दिसणारीच असावी.

गवडानऽ खादऽ पाप ना पूनः --

गाढवानें खाल्लें पाप ना पुण्य. अनाठायीं धर्म केला असतांना पुण्य घडत नाही. सदृश म्हण– गवडाले दिधऽ पाप ना पून.

गवडाले गूप नीं काय चवः--

गाढवाला गुळाची चव काय ! अरसिकेषु कवित्व निवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख.

गवडाले देऊ नही मान, अस्तुरिले देऊ नही कानः--

हलक्या माणसाला कधींहि मान देऊ नये व स्त्रियांचे कधीं ऐकू नये. स्त्रीनें सांगितलेलें चौकशीविना खरें मानूं नये. हा अर्थ.

**गवत्या वठना जेवाया, ताकसंगऽ शेवायाः–**

गांवढळ माणूस जेवायला बसला आणि दुधाऐवजीं ताका-बरोबर शेवया खाऊं लागला. गांवढळ माणसाच्या ठिकाणीं योग्या-योग्यतेचा, शिष्टाचाराचा, सौंदर्याभिरुचींचा अभाव असतो.

**गरज गई सरी, वईद ग्या मरीः–**

गरज सरो, वैद्य मरो. लेना पार्टीदारी–काम गेलऽ सरी वईद गेला मरी.

**गरजही तो पडही काय, जो बोलही तो करही काय?–**

गर्जेल तो पडेल काय, बोलेल तो करील काय ? गर्जणारा मेघ पाऊस देईलच हें सांगता येत नाहीं. बोलका मनुष्य बोलल्या प्रमाणें वागेलच हें सांगता येत नाहीं.

**गरजवानले अक्कल नहीः–**

गरजवंताला अक्कल नसते.

**गरीबले देवा नि तिनी जोस दावाः–**

गरिबांची गरज पुरविण्यास हरकत नाहीं पण अशी गरीब माणसें मागाहून शिरजोर होतात.

**गरीब गाय पोटमा पाय.–**

गरीब गाय पोटात पाय.

**गवराई सजनी, शंकरले पावनीः–**

शृंगार, थाटमाट करून गौरीनें शंकराला प्रसन्न करून

घेतले, एखाद्या स्त्रीनें हिकमतीनें रागावलेल्या पतीची समजूत घालून प्रसन्न केले त्या वेळेस ही म्हण वापरतात.

**गहिरऽ पानी आबादानी**

पाणी पाऊस भरपूर पडला की, सर्वत्र आबादानी असते. घरांत भरपूर पैसा असलेल्या सुखी माणसाला उद्देशून ही म्हण वापतात.

**गहिनागाठा लोकनऽ भूमन मना मायनऽ**

लोकांच्या दागिन्याचा व्यर्थ अभिमान कशाला! माणसानें आपल्याच वस्तूंचा अभिमान बाळगावा.

**गयवान्या, घर घान्या.**

घरांत अव्यवस्थित मनुष्य असल्यास घरांतील वस्तूंची नासधूस होते.

**गाय गोठामा, मोल बजारमा.**

पाण्यात म्हैस वर मोल.

**गाई म्हशी कोन्या, घी खाये नेरना वान्या.**

गाई म्हशी दुसऱ्याच्या, तूप-मात्र नेरचा वाणी खातो. दुसऱ्याच्या जीवावर चैन करणाऱ्यास उद्देशून ही म्हण वापतात.

**गाई गया, गव्हार झाया.**

गावाला गेला आणि त्या गावासारखा झाला किंवा तेथें रमल्यामुळें निष्काळजी झाला.

**गाडी घोडऽ लोकनऽ भूसन मना बापनऽ.**

गाडी घोडे लोकांचे, भूषण माझ्या बापाचें. दुसऱ्याचें वैभव

असतांनाहि आपल्या बापाचें तें वैभव आहे असा खोटा डाल मिरवण्यांत काय अर्थ आहे.

**गाव तठे म्हारवाडाः—**

गांव तेथें महारवाडा.

**गावजानी कोनले मानी.**

स्वैर स्त्री कोणाचाहि उपदेश ऐकत नाहीं किंवा तिला कोणाचेंहि नियंत्रण आवडत नसतें.

**गाय घोई नि कुत्राले पाजीः—**

गोदोहन करून दूध काढलें व शेवटीं तें कुत्र्याला पाजून दिलें. सज्जनांना त्रास देऊन पैसा अगर वस्तू घेऊन दुर्जनांना देऊन टाकल्या.

**गाजरभर इकडऽ की सुयाभर तिकडऽ**

थोडेसे इकडे कीं तिकडे अनेक वस्तूचें वजन करीत असतांना कांटा तंतोतंत रहात नाहीं. व्यवहारांत अगदींच कांटेकोर पणानें वागून चालत नाहीं.

**गोजीना गून सोजीले, सोजीना गून गोजीलेः—**

गोजीचे गुण सोजीला व सोजीचे गुण गोजीला. एकमेकांच्या संगतींत एकमेकांचें गुण लागतात.

**गोरी गोमटी, कपाय करंटीः—**

गोरी बाई असली तरी ती करंटी असल्यास तिच्या गोरेपणाबद्दल अभिमान बाळगण्यांत काय अर्थ. एखादी वस्तू केवळ दिसाऊ

असल्यास उपयोग काय ? ती वस्तु उपयोगी आहे किंवा नाहीं हें पाहिले पाहिजे.

**गोड ऊस झाया तरी मुया सगट नही खावाः—**

गोड ऊस तळामुळासकट खाऊं नये.. दाता चांगला व उदार असल्यास त्याला फार त्रास देऊं नये. त्याला भिकारपण येईल असें वर्तन करूं नये.

**गोड घाश्या, घरनाश्याः—**

जिभेचें अवास्तव चोचले पुरविणारा शेवटीं घरदाराचें वाटोळे करतो.

**गाव बय आनी हनुमान वेंबी चोयेः—**

हनुमानानें गांवाला आग लावल्यामुळें इकडे गांव जळत आहे तर तिकडे आपल्या असल्या कृत्यानें आनंदित होऊन समाधानानें हनुमान वेंबी चोळींत उभा राहिला आहे. दुसऱ्याचें नुकसान करणाऱ्या माणसांना आपल्या दुष्कृत्याबद्दल वाईट न वाटतां समाधान वाटतें असा अर्थ.

**गांढे रंगदार, नकटे दिमाखदारः—**

कांहीं माणसें शक्तिहीन असून किंवा त्यांच्या ठिकाणीं न्यूनता असूनहि जगात तीं अकारण टेंभा मिरवितात. षंढ वरकरणी पौरुषाचा आव आणतो व नकटा मनुष्य जगांत दिमाखानें मिरवितो. अशा माणसांचा उपहास या म्हणीच्या द्वारें केला जातो.

**गावना महाजन, घर रिकामा राशनः—**

सर्व गांवांत एखादा मनुष्य महाजन गांवप्रमुख म्हणून मिरवितो

मात्र अशा माणसाच्या घरीं राजण रिकामे असतात. जीवनोपयोगी धान्य व इतर गोष्टींचा अभाव असतो. नांव मोठें लक्षण खोटें अशा सारखी ही म्हण आहे.

**घरना सुतार आखु बाडगीनी निवाव:—**

घरचा कारागीर असूनहि घरच्या माणसांना त्याच्या कारागिरीचा कांहींच उपयोग नसतो. अंगच्या कलेनें कलावंताला ज्या गोष्टी निर्माण करतां येतात, त्याच्या घरीं त्या गोष्टीचा अभाव असल्यानें घरच्या माणसांना त्रास होतो. कलावंताच्या घराविषयींच्या अनास्थेला उद्देशून ही म्हण आहे.

**घर लहानऽ, मानूम कुहिनऽ**

घर लहान त्यात घरात राहूं देणारा तुसड्या स्वभावाचा त्यामुळें पाहुण्यास जास्त संकोच वाटतो.

**घट्या चालना रातना, घरमा नही कयना:—**

रात्रभर जात्यावर दळूनहि घरांत खाण्यासाठीं कळण्यासारखे हलके धान्यहि नाहीं व दिवसभर कष्ट करून पोटाला पुरेसे खावयास न मिळणें रात्रभर काम करण्याचा आव आणून घरांत वळण्याच्या पिठाचीं चिमूटहि न ठेवणाऱ्या अव्यवस्थित स्त्रीलाहि उद्देशून ही म्हण योजितात.

**घरनी आंधयी, पराईनी चान्नी:—**

बाहेरख्याली मनुष्यास आपल्या अव्यंग स्त्रीतहि दोष दिसतात व परस्त्री कशीहि असली तरी त्याला चांदणीप्रमाणें तेजस्वी वाटते.

**घरमा मोरी, मुतानी चोरी:—**

घरांत मोरी पण मुतण्याची चोरी. घरांत सर्व सुखसोयी असतांना त्यांचा उपयोग घेतां न येण्यासारखी परिस्थिति असतांना ही म्हण वापरतात.

**घरनी नही माने, आन लोकवर डोया ताने:—**

स्त्री तर याची आज्ञा धुडकावून देते आणि लोकांनीं आपलें म्हणणें एकावें यासाठीं हा त्यांच्यावर रागानें डोळे ताणतो.

**घर-ह्यायनी ती शानी, बाहेर गयी ती गयवानी:—**

घरीं राहिली ती शहाणी, बाहेर निघाली ती अव्यवस्थित अविचारी. स्त्रियांनीं घराबाहेर पाऊल टाकल्यास बिघडतात इत्यर्थ.

**घर ना दार, चावडी बिढार.**

घर नाहीं बायको नाहीं (दारऽ दारा) चावडी हेंच राहण्याचें ठिकाण. उपऱ्या माणसाला उद्देशून ही म्हण वापरतात.

**घरनी अस्तुरी वयतनासाठी रडे, परायी रंडीसाठे खोड चंदनना फोडे.**

घरची पतिव्रता स्त्री सरपण नाहीं म्हणून रडते व गृहचालक पण परस्त्री लोलुप मनुष्य परक्या स्त्रीसाठीं मूल्यवान व सुवासिक अशा चंदनाच्या झाडाचें खोड तिला सरपण म्हणून उपयोग व्हावा म्हणून फोडतो.

**घरमा नही दाना, बाजीराव म्हना.**

यांच्या घरांत दाणा नाहीं व हा आपणास बाजीराव म्हणावे

अशी इच्छा करतो. संपत्ति नसतांना मानानें मिरविण्याची हौस करणें व्यर्थ आहे.

**घरना भेवखाल लिधऽ रान वाटवर भेटना मुसलमानः—**

घरांतील माणसाच्या भीतीमुळें रानात पळून गेलें तेथेंहि मुसलमान भेटला. आगींतून निघून फोंफाट्यात जाऊन पडणें या अर्थी ही म्हण आहे.

**घरदार देव देव, असीलले खाव खावः—**

देव धर्माचा धर्म निष्ठेचा आव आणणारा सावकार कुळाला पाहिल्यावर धर्म विसरतो व त्याला खाऊ की ठेवूं असें वर्तन करतो.

**घस चंदन, व्हय लाल**

अर्ध्या हळकुंडानें पिवळे होणें. लवकर लाल व्हावयाचें असल्यास चंदन घास व लाल हो. उतावीळ पणा कोणत्याहि गोष्टींत उपयोगी नाहीं.

**घरना घाना, बाहेरना नाना.—**

घरच्या माणसाची कोणींहि कदर करीत नाहीं. इतकेंच नव्हे तर घरच्या माणसाम तो गुणवान असतानाहि ' घाण – वाईट ' आहे अशी नावें ठेवण्याची माणसाची प्रवृत्ति असते. बाहेरचा मनुष्य मात्र चुकल्याप्रमाणें वाटतो व अशा बाहेरच्या माणसाची कदर केली जाते.

**घर घुशी घर नाशीः—**

घरात बाहेरची स्त्री ( रखेली ) बळेंच आली की संसार

उध्वस्त झालाच म्हणून समजावे.

**घरमा नही खावाले, माय गयी दयालेः—**

घरांत नाहीं खाण्याला आई गेली दळण्याला. ऐन वेळेवर केलेल्या गोष्टी त्रासदायक होतात. कोणतीहि गोष्ट वेळेवरचं पाहिजे.

**घरघर माटीना चुल्हाः—**

घरोघर मातीच्या चुली.

**घल्डी मनी रिकामी, काय करस वऽ मामीः—**

काम सोडून बिछया दुसकणें. घागर तर माझी रिकामी व रस्त्यांत मी मामीची खुशाली विचारीत बसले अगोदर हातांत घेतलेले काम पुरे करावें, हा इत्यर्थ.

**घटी घठना देव, नवसाले पावः—**

कोणतीहि गोष्ट निश्चयपूर्वक करूं लागलो म्हणजेच तो निश्चय सिद्धीस जातो.

**घागरा फडकी घर, माले म्हने लगन धर—**

वाग्निश्चयाचें सामान घरीं आणि मला म्हणतो लग्न धर. प्रारंभींचे महत्त्वाचे कार्य केल्याशिवाय पुढील कार्ये होत नसतात.

**घाव बुझस पन डाव नही बुझस—**

घाव बुजतो पण डाव बुजत नाहीं. शस्त्राची जखम कालांतरानें बरी होते. पण अपमानास्पद बोलण्यानें हृदयाला झालेली जखम लवकर बरी होत नाहीं.

**घ्या नाचाडी, घ्या तंगाडी—**

भोंवाड्यांतील नियोजित सोंगें एका रात्रींत मिरवून प्रसंग पार पाडावा लागतो. कसें तरी कार्य उरकून घ्या, असा अर्थ.

**घुंगुट घेये तोंडवर आंग दिखस खालवर—**

कोणतीहि गोष्ट परिपूर्णतेनें केली पाहिजे. घुंगुट तोंडावर घेतले पण सर्व अंग उघडे असले तर काय कामाचे !

**घे तुनऽ लुगडऽ नहीं व्हत तुनी बायको —**

तुझें लुगडें घे हें मी तुझी बायको होत नाहीं. उतावळ्या स्वभावाची माणसें थोडेसे जरी मनाविरुद्ध झालें तरी चालू कार्यांत भाग घेण्याचे टाळतात.

**घेवा देवा काही, लेवा देवा काही—**

एकादी वस्तू विकत घेतांना अतिशय महाग पडते पण तीच वस्तू विकतांना अत्यंत स्वस्त भावानें विकली जाते. कोणतीहि गृहोपयोगी वस्तुचा संग्रह करणें कठीण पण तिची विल्हेवाट लावणें सोपे जरी असले तरी अहितकारक.

**घोडी मरे भारानी, शिंगरू मरे येरझारनी—**

घोडी ओझ्यामुळें मरण्याच्या पंथास लागते तर घोडीचें शिंगरू ओझे वहात नसतांनाहि केवळ येरझारांनी मरते. माणसास आपलें काम नसतांना निष्कारण त्रास झाला असतांना अगर कोणाच्या भिडेखातर त्रास घ्यावा लागला असतांना ही म्हण वापरतात.

**घोडा गुनवर दाना खास, गधडा लाथा खास—**

घोड्याला त्याच्या अंगच्या गुणांमुळें हरबऱ्याचें दाने खाण्यास

मिळते; उलट गाढवाच्या नशीबी मात्र लाथा असतात गुणवान माणसे अंगच्या कर्तृत्वामुळें सुख, वैभव मान मिळवितात. कर्तृत्वहीन माणसांना जगाचा उपहास सहन करावा लागतो. त्यांना जग मान देत नाहीं, असा अर्थ.

**घोडे इकत्र, डांगरऽ खात्र:—**

घोडे कितीवा मोलाचे असेना पण खरबुजें खाण्यासाठीं त्यांची मी विक्री करीन पण खरबुजे खाण्याची हौस मी पुरी करीन-जिभचे चोचले पुरविणारी अगर चैनीला सवकलेली माणसें जवळच्या मूल्यवान पदार्थांची वासलात अल्पमोलानें लावून आपले चोचले व चैन पुरविण्यास मागें पुढें पहात नाहींत.

**घरमा नही दाना, दारसे नगारखाना:—**

घरांत तर धान्याचा कण देखिल नाहीं, आणि दारावर वतनदारीचा सरंजामशाहीचा पोकळ अभिमान दर्शक असा नगारखाना आहे. मोठा घर पोकळ वासा अशा अर्थी ही म्हण आहे,

**तीनी दुन्या, सव्वदले मारया:—**

चालू काळांतच जग मान देते. मत्र असेल तोपर्यंतच माशा असतात.

**चन बावरी, गाव डवरी:—**

चंचल स्त्री सर्व गांवभर फिरत राहते.

**चक्कर पुजा देवनी, घोकड्या खादा मानूसनी:—**

देवाचे नांव आपले गांव, धर्माच्या नावाखालीं आपला स्वार्थ साधणें.

**चम्हरना देवले खेट्रस्नी आरती—**

चाभाराच्या देवाची खेटरानीं पूजा. जसें साध्य तशीं साधनें उपयोगात आणावींत.

**चवानऽ ना धवानऽ**

एखाधा पदार्थास चवहि नाहीं व सुदर रंगहि नाहीं, त्यावेळेस ही म्हण उपयोजितात.

**चावधनऽ आमपाईन पावनालें—**

पाहुण्यास गप्पा मारण्यासाठीं फार तर आमच्याकडे येऊ द्या. पाहुण्याचें जेंवण मात्र तुमच्या घरींच होईल. स्वार्थी माणसें कोणनाहि तोशीस सहन करण्यास तयार नसतात.

**चावमा पडनी वेडकुयी, मांगस पुरनपोयी—**

वेडकुळी खुशीन आली व पुरणपोळी मागू लागली तिला अगोदर खाण्याचें दिलें व खूप केलें. पण ती जास्त लाडांत आली व लोभानें पुरणपोळीची अपेक्षा करू लागली. गरजू माणसाचें समाधान गरजेच्या वस्तू दिल्यानंतर व्हावयास पाहिजे. तथापि जो जों गरजा पुरवाव्यात तों तों तीं माणसें अधिक लोभात पडतात.

**चावडीवर वठना नीट, घरमा नहीं तिखट मीठः—**

बाहेर पुढारकी मारणाऱ्याच्या घरातच आवश्यक गोष्टींची उणीव असते

**चाफल चुफल गावभर, नथनी वे नाकवरः—**

नाकांत नथ असूनहि गांवभर नथेचा शोध करीत फिरणें.

**चारीस्त्री माय, खाटवर जीव जायः—**

चौघांची आई झाल्यानें बाजेवरच बाळंतपणामुळें जीव जतो. स्त्रीची विशेषतः दारिद्र्यानें भिटलेल्या स्त्रीचा बाळंतपणांत व्यवस्था न राहिल्यानें तिचा अंत होतो.

**चाल मना संगे दावसू मना ढंगेः—**

माझ्याबरोबर चल म्हणजे तुला माझे ढंग दाखवीन, माझ्या संगतीनें तुला माझे गुणावगुण कळतील.

**चिडी साचा करे हाथ्या वोकना भरेः—**

चिमणी कष्टानें वस्तूंचा संग्रह करते आणि कावळा चिमणीनें परिश्रम पूर्वक जमविलेल्या संग्रहाचा यथास्थित समाचार घेतो. घराचा भिडस्त चालक पोटाला चिमटा घेऊन मोठ्या प्रयत्नानें पैसा गोळा करतो व त्याचा उपभोग त्याचा चैनी नातेवाईक यथास्थित रीतीनें घेतो.

**चीत नही घरी, आईबाईनऽ मोकस भरी किंवा घनगऽ करी.**

गृहसंसारांत स्त्रीचे चित्त लागत नसल्यास शेजारणीचे चांगलेच फावते. गृहकर्तव्य पराङ्मुख स्त्री आपण होऊन परक्यांचा फायदा करून देते.

**चुल्हाना लाकूड चुल्हामा बयी जाईः—**

चुलीचे लाकूड इकडे तिकडे ठेवले तरी शेवटीं केव्हांतरी चुलींतच जळेल. मुलीला फार दिवस माहेरी ठेवून उपयोग तरी काय ? शेवटीं तिला केव्हांतरी सासरी नांदण्यासाठीं जावें लागेलच.

**चोर ते चोर आखु शिरजोरः—**

स्वत चोर असूनहि खत वाटत नाहीं. असा मनुष्य इतरावर छाप पाडण्यास उद्यक्त होतो व मस्तवाल्पणानें वागतो.

**चोरीना गयाले दोरी, निदाननऽ व्हइ तेंच पुरीः—**

चोरी करणाराच्या गळ्याला नेहमी दोरी असते. आपले स्वस्त चें व स्वस्त च्या कमाईचें जें असेल तेंच शेवटपर्यंत पुरु शकते.

**चोरनऽ बोंबलनऽ वर जाई बठना बंगलावरः—**

स्वस्त. चोरी करून चोरी झाली चोरी झाली अशी बोंब मारावयाची व आणखी वर फौजदारास चोरी झाल्याची वर्दी देण्यासाठीं बंगल्यावर जाण्याची तयारी करावयाची अशा माणसाचा उपहास करण्यासाठीं ही म्हण उपयोगात आणतात.

**चोरीना मामला, वागऽ वागऽ बोलाः—**

चोरी करून आणलेली वस्तू पचाविणें जरा जडच असते. अशा वस्तुचीहि चोरी झाल्यास मूळ चोरास आरडाओरड्ड करताहि येत नाहीं. (२) चोरी करून आणलेली ही वस्तु आहे. वाटे पाडण्यासाठीं हळूं हळूं बोला.

**चोरन्या उफल्या बोंमा —**

चोराच्या उलट्या बोंबा.

**छटाभर दारू समदं गांव डोक्यावर धरूं —**

छटाक दारुचा अम्मल तो किती येणार पण तेवढ्यानेही अम्मल आलेली आहे असे दाखविणारे व सर्व गावाचें लक्ष आपल्या बडबडीकडे वेधून घेणारे दारुबाज या जगात कमी नाहींत. जवळ

संपत्ती व ज्ञान कमी असतानांही आपण खूप संपत्तीमान आहोत व ज्ञानी आहोत असे दाखविणारे लोक जगांत प्रत्येकाच्या परीचयाचे असतांलच.

छिनाल नारी सटव्या भगतः—

वाईट चालीच्या स्त्रीचा चपा काढणार शेराला सव्वाशेर असे लोक असतातच व तेच अशा स्त्रीयांना योग्य असतात. समसमासंयोगाचेच हें उदाहरण आहे.

छिनालशी भांडण अब्रूदारनं मरणः—

बदचालीच्या स्त्रीशीं अब्रूदार माणसानें भांडू नये। अशा भांडणांत त्या स्त्रीच्या तोंडाला सभ्यतेच्या अभावी कुलूप नसल्यानें अब्रूदार माणसाला भर मंडळींत खालीं पहावें लागते.

छिनाल नारले बारावुद्धी फोडऽ कपाय चांधी चिंधीः—

वाईट चालीची स्त्री चंचल असते, ती कोणत्या वेळेस काय करील याचा नेम नसतो. वाटेल तसा अक्रस्ताळपणा करण्यासही ती मागेपुढें पाहत नाहीं.

जनावा ते चांद नाहि ते न्हावा वांझः—

एकश्चन्द्रस्तमो हन्ति नच तारागणोऽपिच- चंद्रासारखा तेजस्वी शांत स्वभावाच्या मुलाला स्त्रीनें जन्म द्यावा. कुपुत्र असण्यापेक्षा वांझ राहिलेले काय वाईट.

जवाईन पोर, हराम खोरः—

जावयाची जात जशी हरामखोर त्याचप्रमाणें त्याचे मूलहि

रामखोरच असते. खाण तशी माती अवलादीवर जाती. या म्हणीसारखा अर्थ.

**जातनी-खावा लात, परायानां खाऊनही गुयभातः—**

स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः।

स्वजातीनें, स्वसमाजानें कितीही उपेक्षा केली तरी स्वजातीचा अभिमान धरून त्याच जातींत राहावें. परंतु या उपेक्षेला त्रासून परक्याच्या भूल थापाला, आमिषाला किंवा थोड्या स्वार्थासाठीं बळी पडूं नये. असें बळी पडल्यास शेवटीं ते पश्चातापकारक ठरतें. अशा अर्थाचा जातीकारितां माती खाण पडत, अशी म्हण आहे.

**जांगल्या जागल करी, गधडड गयड चरीः—**

जांगल्या इकडे जागल करतो आणि गाढव तिकडे शेतांत माल खातो. ध्येयाकडे लक्ष ठेवूनच काम केलें पाहिजे. ढोरहुमाला काय कामाचा ?

**जांन जाय जेजूरी, ते संग लेवा शिदोरीः —**

जेजूरीला जावयाचे असल्यास बरोबर शिदोरी घेण्यास विसरूं नये । कोणतीहि गोष्ट दूरदर्शीपणानें केली पाहिजे

**ज्यानी खावनो पोयी त्यानी वाजवनो टायीः—**

ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी. ज्याचे अन्न खावे त्याचीच स्तुती करणें इष्ट.

**ज्यानी बेटी, त्यानी मान हेटीः—**

ज्याची मुलगी असतें त्याची मान नेहमी खालीं असते. ज्यांत वधूपक्षाची बाजू जरा न्यायाची असली तरी वरपक्षाच्या

अेरावीला मुलीच्या अंतिम कल्याणासाठी मान तुकवावी लागते.

**ज्यले त्याले नही चोप, शेजान्पाले नही झोपः—**

ज्याच्यावर नगारखान्यांतील नगान्यावर वक्तशीर तास आ[illegible] घटका, प्रहर पूर्ण झाल्याबद्दल चोप देण्याचें काम सोपविले[illegible] असतें तो बिनघोर निजतो आणि शेजारी मात्र पहिल्या माणसा[illegible] नगान्यावर चोप देण्याची वेळ टळेल या भितीनें रात्रभर जा[illegible] राहतो. दुसऱ्याच्या कर्तव्यपूर्तीसाठी आपलें स्वास्थ बिघडून घेण्य[illegible] कारण नाही.

**ज्याना धनी नही पास त्याना कुय वाडीना नासः—**

ज्याचा शेतांचा धनी जवळ नाहीं अगर शेताकडे [illegible] मालक लक्ष देत नाहीं त्याच्या शेतांतून उत्पन्न होऊं शकत नाहीं[illegible] अव्यवस्थेमुळें शेती अगदी निकामी झालेली असते.

**ज्याना कायया त्यानाच वानोयाः—**

ज्या गोष्टी चा कंटाळा तीच नावडती गोष्ट भेट म्हणून ये[illegible] ज्या गोष्टीं विषयीं तिरस्कार वाटतो तीच गोष्ट घरांत वि[illegible] असल्यास अगर दुसरीकडून मुबलक आल्यास नावडती गोष्ट क[illegible] नशिबी येते.

**जिन्हा हातमा चुल्हा, तिन्हा उफटा कुल्हाः—**

शिजविण्याचें काम जिच्याकडे असते ती बाई मोठी अव[illegible] बाज असते. इतर घरांतील मंडळींशीं ती अेरावीनें वा[illegible]ते.

**जो करी बांध बंधनी, तो खंडीना धर्नीः—**

जो शेतकरी शेताची बांध घालून झीज थांबवितो त्य[illegible]

त्याचे शेतांत खंडोगणती धान्य पिकवितां येणें शक्य असते.

**जो फुकट खाय त्याले स्वस्त महाग काय:—**

जो फुकटाचें खातो त्याला खाण्याचे पदार्थ हे बाजारांत महाग मिळतात कीं स्वस्त मिळतात याची पंचाईत करण्याचें कारण नसतें. तो स्वस्त आहे कीं महाग आहे याची पर्वा करीत नाहीं.

**जोडा काढले जागा जोयजेः—**

ज्याला मुलें नाहींत अशा मुलीशीं आपल्या मुलाचें लग्न लावून देण्यास पूर्वींचीं माणसें नाखूष होतीं. कारण त्याचें म्हणणे असें कीं मुलींचें सासू सासरे वारल्यानंतर मुलाला जाण्यायेण्यास संधी मिळणार नाहीं.

**जोई जोई कयां यही जातना निघना भोई:—**

सतरा ठिकाणीं विचारपूस, चिकित्सा करून सोयरेसंबंध जोडला, पण तो शेवटीं स्वतःच्या जातीचा न मिळतां भोई जातीचा होता असें कळून आलें. कोणत्याहि बाबतींत अती चिकित्सा कार्याच्या अगर हेतुसिद्धीच्या आड येते.

**झाटमा झिंगा, दायमा खसखसः—**

अतिदाट केसांमध्यें कीडा असलेला समजून येत नाहीं किंवा समुद्रांत'खसखसी सारखा बारीक दाणा दिसून येत नाहीं. अडचणी अनंत भासल्या तर एवढ्या तेवढ्या मदतीनें काम भागत नाहीं किंवा जगांत एकापेक्षां एक संपत्तीनें, ज्ञानानें वरचढ माणसें असली तर आपल्या जवळ असलेलें ज्ञान किंवा पैसा हा अत्यंत अल्प आहे हें दर्शविण्यासाठीं ही म्हण योजतात.

झिपरी मारे झपाटा चोंभाटिना बोभाटाः —

केस पिंजारलेली अव्यवस्थीत बाई एकादी गोष्टी अगर नुकसान करून जाते पण ती तोंडाळबाई तिनेंच ती खोडी अगर नुकसान केलें असावे असा बोभाटा करते. ' चट्टी पट्टीना बोभाटा, झिपरी मारे झपाटा ' ही समानार्थी म्हण आहे

झाल झेंडा आदुगर, लगन मागथिन धर किंवा करः—

लग्नाच्या अगोदर लग्नानंतरचें विधि कर्मे करता येणार ! झालझेंडा अगोदर व्हावयास पाहिजे लग्न मागाहून धरा. असा म्हणीचा अर्थ आहे. कोणत्याहि गोष्टी सुसंगत रीतीनें व क्रमाक्रमानेंच व्हावयास पाहिजे. तशा झाल्या नाहीं तर असगत गोष्टींचा उपयोगहि नसतो व जगाच्या हास्याचा विषय बनतात.

झिपरीनेंऽ लग्न, वानरीले पहिलऽ बलाव्हन —

संन्याशाच्या लग्नाची शेंडीपासून सुरवात, अशा अर्थी ही म्हण आहे. झिपऱ्या ( केस कधींहि न विंचरलेल्या ) मुलीचें लग्न असल्यास अगोदर वानरीला मूळ म्हणून तिच्या डोक्यातील उवा काढण्यासाठीं बोलवावे लागेल. एखाद्या अपात्र माणसाचें नशिब उदयास येऊं लागल्यास दुसरा मनुष्य त्याच्या अपात्रता उघड करून सांगतो व पहिल्याचा उपहास करतो.

टेल टिकोरी गावभर, काम नहीं काडीभर —

उनाड टप्पू माणसें गावभर टेहळणी करीत फिरतात पण जरूरीचीं कामें यत्किंचितहि करीत नाहींत अशा ऐतखाऊ,

कामाची टंगळमंगळ करणाऱ्या गुंडाचा उपहास या म्हणीच्या द्वारें केलेला आहे.

**ठाऊक मना टिकोऱ्याले —**

मला कशाचीही पर्वा नाहीं असा अर्थ होतो.

**ठाव ना ठिकान वऱ्हाडनऽ दिधंऽ ठान —**

लग्नाला तर पत्ता नाहीं, वऱ्हाडी मात्र सर्व जमले. कोणत्याही मुख्य गोष्टीची त्यारी नसताना दुसऱ्याला भारुड सटर फटर गोष्टींची गर्दी होणें.

**डाग्निना बीमारीले आग्या येताय वईद : —**

जसा रोग असेल तसाच उपचार पाहिजे.

(२) चाभाराच्या देवाला खेटराची पूजा असाहि अर्थ या म्हणींतून निघतो.

**डागडागिना मनभर झुडकुऽ आंगवर : —**

कोणत्याहि गोष्टींत संगति ही पाहिजेच. दागदागिने खूप अंगावर घातले व वस्त्रें फाटकी असली तर काय कामाचे ? जीवनोपयोगी वस्तूंना अगोदर प्राधान्य दिले पाहिजे.

**डिकरा मन्हा मयाना, वोटभर चिट्ठी धाडीना : —**

माझ्या पुतण्या मोठा मायाळू आहे. असें सर्वत्र सांगणाऱ्या बाईला त्याच्याकडून साधे पत्रहि येत नाहीं. आपण ज्याच्याविषयीं प्रेम बाळगतो, त्यानीहि आपल्याविषयीं तितकेच प्रेम दाखविलें पाहिजे. आमचे एकमेकाचे संबध दुरावलेले आहेत. हें या म्हणीच्या द्वारें दर्शविलें आहे.

**डोक्याले खवड अनु गुलालनीं हौसः—**

डोक्याला खवद असतांना डोक्यावर गुलाल भरून घेण्याची हौस व्यर्थ होय. जन्मजात उणीव असतांना शृंगारीक गोष्टींची आवड धरणें इष्ट नाहीं.

**डोमाना घर तारामती, कुजात ना घर असीलना माटीः—**

हरिश्चंद्राच्या तारामतीला दैववशात्, डोंबाच्याच्या घरीं राबावे लागले. वाईटाच्या संगतींत असलांची—सज्जनांची अवहेलना दुर्दशा होते.

**त म्हणता तपेल वयखावडः—**

शितावरून भाताची परीक्षा करणें. थोडक्या चांचणीवरूनहि पूर्ण कल्पना करून घेणें.

**तंमाकू वे वचकी, भलतापन दात इचकीः—**

तम्बाखू तर अत्यंत थोडी पण तंबाखूच्या व्यसनाच्या आहारीं गेलेला माणूस तंबाखूसाठीं दांत विचकतो. क्षुल्लक गोष्टीसाठीं मोठ-मोठे लोकहि अडीत होतात व ती जिथें मिळेल तिथें प्रयत्न करतात.

**तनतन तानी, मोसमनऽ पानीः—**

मोसम नदीच्या काठीं राहणारे लोक अकारण संतापतात व कोणत्याहि क्षुल्लक गोष्टीचें चऱ्हाट वळतात. असा अर्थ या म्हणींत अभिप्रेत आहे.

**ताक मांगाले जानऽ से तर पाठीमांग वाडगी का म्हूनः—**

ताक मागावयास जावयाचे तर ताक आणावयाच्या मातीच्या भांड्याची लाज कां म्हणून ! कोणतीही इच्छिलेली गोष्ट पार

पाड वयाची असल्यास त्याची साखरें हलकी असली तरी लाज बाळगतां कामा नये.

**तातांना जीव जास थंडाले हीरऽन्हायः—**

उंदराचा जीव जातो मांजर म्हणते वातड लागते. शेतांत जें ताजे ३ ।हे त्याची टवटवी पाण्याच्या अभावीं निघून जाते. पण थंड पिकासाठीं, जळालेल्या पिकासाठीं विहीराचें पाणी चालू केलें असा अर्थ. जी गोष्ट आवश्यक असेल तीच वकशीर केली पाहिजे. जो होतकरू असेल त्यालाच मदत करावी.

**ताय ना मेयः—**

बिन हिशेबी खर्चामुळें जमाखर्चाचा ताळाही जमत नाहीं व मेळही बसत नाहीं कोणत्याहि गोष्टीचा सोयसुमार नसल्यास अंदाधुंदी माजते.

**तावेल तवावर पोयी भाजी लेवाः—**

तापलेल्या तव्यावर पोळी भाजून घेणें. संधी चालून आली असतांना संधीचा फायदा करून घेणेंच इष्ट.

**त्याले फार खाज होः—**

त्याला त्यां गोष्टींची जाणून बुजून आवड आहे. मग तें काम स्वतां करावें लागल्यास कुरकुर काय कामाची.

**त्यांनीं दाय वतू जायीं, मना रोडमा थोड।ज नासहीः—**

त्याची दाळ ओतू जाईल माझा रोडगा थोडाच नासणार आहे. मुलगी वयांत आल्यानंतर पति सुख मिळाले नाहीं तर ती व्यभिचार करूं लागेल व अशा रितीनें आई बापांची अब्रू

स्वत:च्या सुखासाठीं धुळीला मिळविल. पण मुलगा वयांत आल्यावर त्याचें पाऊल वाकडें पडलें तरी जग नांव ठेवणार नाहीं. मुलगी सासरीं न पाठविणाऱ्या व्यांहास उद्देशून ही म्हण योजतात.

**तीथ सोडी भीत कसाले पूजवाः—**

योग्य तिथीला व्रतपूजा करण्याचें सोडून आडवारीं भिंतीची पूजा कशाला करावयाची काहीं व्रतांत ( उदा— लिंबायत इ. ) भिंतीवर चित्रें काढून त्याची पुजा करतात त्यावरून ही म्हण प्रचारांत आली. योग्यवेळीं योग्य काम करावें. अवेळीं तें कार्य हातीं घेतल्यास कालापव्यय.

**तुले माले सांगाले, भगत लागा घुमालेः—**

वरपांगी ढोंग— जगाच्या डोळ्यांत धूळ फेकण्यासाठीं अंगांत आणण्याचें सोंग करणें.

**तू सुवासीन मी गन, नको करू लोकनऽ धनः—**

इतर बाहेरचे कोणीहि मेहूण न घालता घरच्या घरीं. नवरा बायकोनें मेहूण म्हणून अगर माता पितर जेऊन घेणें घर चालकास खर्च वाचविण्याच्या दृष्टीनें इष्ट वाटेल. अशा वेळेस पति बायकोला घरचें अन्न लोकांना नाहक खावयास देऊं नको. असा प्रांजळ सल्ला देत असतो.

**तू कर वटवट, मी से निगर घटः—**

मी अत्यंत निर्लज्ज असल्यानें किंवा कठोर हृदयीं असल्यानें माझ्यावर तुमचा बोलण्याचा कांहीं परिणाम होणार नाहीं.

**तुले न माले, घाल कुत्राले:—**

वस्तुचा फायदा तुलाही नाहीं व मलाही नाहीं शेवटीं परकाच हीन मनुष्य फायदा घेतो.

**तुनऽ मनऽ घाल धिंगानऽ —**

तुझें माझें करून— भांडण करून हेदोसदुद्धा करणें असा अर्थ.

**तुन्हऽ मन्ह जमेना, तुनामितुक करमेना:—**

तुझें माझें जमत नाहीं हें खरें आहे. तथापि तुझ्या वांचून घडीभरहि करमत नाहीं असा अर्थ. नवराबायको घरांत असताना भाडू लागतात पण त्यांच्यापैकीं एक जरी बाहेर गावी गेले तरी दुसऱ्याला करमत नाही. विरोध भक्तीचा हा दाखला आहे.

**तुले नहा चाड, माले लागनऽ येड:—**

तुला माझा पर्वा नाहीं, आणि मला मात्र तुझासारखा ध्यास लागला. एकाधाला आपली काळजी नसते व आपण मात्र त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसतो. श्रीमंत आप्त वर्गाबद्दल भूषण मिरविणारी माणसें जगांत पुष्कळ असतात. तथापि लग्नकार्यांत हीच श्रीमंत माणसें त्याचा अभिमान बाळगणाऱ्यां माणसांना बोलावित नाहींत किंवा अन्यप्रसंगींहि विचारपूस करीत नाहींत. प्रेमाचा वर्षाव एकांगीं काय उपयोगाचा, दुसऱ्यानें आपल्याविषयीं तितकेंच अगत्य बाळगलें पाहिजे.

**तेलवन तेरसले, लगन बारसले:—**

वराती पाठीमागून घोडे उपयोगाचे नाहीं. तेलवण विधि

लग्नाच्या अगोदर व्हावयास पाहिजे. लग्नानतर मागाहून तेलवण विधि करण्यात अर्थहि नाहीं.

**तेलवनले वाजा, लगनले पिपानीः—**

क्षुल्लक गोष्टींस खूप महत्व द्यावयाचें, व महत्वाच्या गोष्टीकडे दुर्लक्ष करावयाचें असा अर्थ या म्हणींतून निघतो. माणसें लहान सहान गोष्टींसाठीं भरमसाट खर्च करतात, पण महत्वाच्या गोष्टी करण्याच्या वेळेस हात आखडतात. कोणत्याहि गोष्टींमध्यें तारतम्य पाहून योग्यायोग्याला जाणून त्या गोष्टींना महत्व द्यावयास पाहिजे म्हणींचा 'तेलवण विधीला बँड व लग्नाला पिपाणी हें क्षुद्र वाद्य' असा अर्थ होतो.

**तेलीना वईल आंग होया मोडे, जाई बठना घाना जोडेः—**

'चुकलेला फकीर मशिदींत,' या सदश ही म्हण आहे. तेल्याचा बैल रागावला आणि रागावून काय केलें तर घाण्याजवळ जाऊन बसला. संसारावर लोभ करणारी माणसें घरातील माणसावर कितीहि रागावली तरी शेवटीं ससारापयोगीच कामें करतात. संसार सोडून कांहीं अशी माणसें जाऊ शकत नाहीं. 'तलीनी बाईल आगडोया मोडे, जाई बठनी घानाजोडे' अशीहि म्हण प्रचारात आहे

**तेली तांबोयी एक घरना भाई—**

दोन सारख्या वर्तनाचीं व्यसनाचीं माणसें एकत्र आलीं असतांना ही म्हण वापरतात.

**तो गया हेटे तूं जाय वरेः—**

तो गेला खालीं तू जा वर. आपल्याला कोणतीहि विचारांत

असलेली गोष्ट मादित नाहीं असा अर्थ या म्हणांतून निघत नाही.

**तोंडमा हरी, बगलमा सुरीः —**

मधु तिष्ठति जिव्हाग्रे हृदये तु हलाहलम् ।. ढोंगी मनुष्य तोंडानें हरि हरि करतो. परंतु मनांत दुसऱ्याचे गळे कसे कापतां येतील याचाच विचार करतो.

**तोंडावर बुरखा, खाली XX किंवा आंग देखाः—**

तोंडावर घुंगट, खालीं दिसे बेंबूट— रीति रिवाजाच्या बाबतींत सारासार विवेक न बाळगल्यास फजिति होते. कांही जातींत वडील माणसादेखत बुरखा घेण्याची स्त्रियांत चाल आहे. एका तरुणीचा सासरा घरात अचानक आला त्यावेळेस तिला बुरखा चटकन न सांपडल्यानें नेसलेला लहंगाच तोंडावर पांघरला. अशा रितीनें आपली लाज (!) तीनें राखली. बाह्यत्कारी करड्यालरयाचा नोक झोक पण घरामध्यें मग मग घाग अशा व्यक्तीस उद्देशून ही म्हण वापरतात. ( २ ) विनयशील पणाचा अगर पातिव्रत्याचा अगर शुचिभूर्तपणाचा बाह्यत्कारी आव आणणाऱ्या दांभिकांच्या व्यभिचारी वृत्तीचा उपहास या म्हणीच्या द्वारें केलेला आहे.

**थापाथुपा, देवधाप्पाः—**

भाकरी फक्त थापण्याचें काम आणि देव देव करण्याचें काम अर्थांत् अत्यंत थोडे काम असणें, खूप रिकामपण, असणें हा अर्थ निष्पन्न होतो.

**दखऽ की भूकऽ:—**

खाण्याचा पदार्थ पाहिल्याबरोबर अधाशी मूल मला ती वस्तु पाहिजे म्हणून भोकांड पसरते. अत्यंत हावरेपणा ज्यावेळीं दिसून येतो त्या वेळेस ही म्हण वापरतात.

**दये तिला कये, फुकटी गोंडा घोये:—**

जी स्वतः दळते तिला दळण्याचें व पीठ मिळवण्याचें कष्ट करतात. फुकट मागणारे मात्र पिठासाठीं व्यर्थ गोंडा घोळतात. ऐतखाऊ लोकांना खऱ्या कष्टाची किंमत नसते.

**दमडीनी कोंबडी रुप्या फयनावय:—**

दमडीची कोंबडी रुपया फळणावळ, क्षुल्लक गोष्टीच्या प्राप्तीसाठीं खूप यातायात व पैसा खर्च करावयास लागणें.

**दाम करे काम, बिबी करे सलाम:—**

या जगांत पैशानें वाटेल तेवढें काम होऊ शकतें. पैसा जवळ असला तर स्वतःचा स्त्रीही मानमरातब ठेवतें. सर्वेगुणाः कांचनमाश्रयन्ते ।

**दिनना साधु, रातना चोर:—**

दिवसाला साधूचा आव आणणारे पण रात्रीला व्यभिचार करणारे ढोंगी लोक जगांत फार आहेत. स्नानसंध्या टिळेमाळा । पोटी क्रोधाचा उमाळा ॥ असें तुकोबा संतांनीं ढोंगी माणसाबद्दल म्हटलें तें योग्य नाहीं कां !

**दिनभर आथी तथी, रात पडी जाऊ कथी:—**

दिवसभर इथें तिथें रात्र पडली जाऊ कुठें: ज्याला कोठेंच

निरारा नाहीं त्याचा दिवस कसा बसा पार पडतो पण रात्रीला मात्र अनुकंपनीय स्थिती निवाऱ्याच्या अभावीं होत असते.

दुघड चाले, घरना वासा हाले. :–

गर्वाचें घर खाली । अभिमानानें पाय टाकून धान्यावर चालल्यास घराचे वासे हल्तात असा शद्बश अर्थ. किंवा द्विधा-वृत्तीनें चालल्यामुळें घर पोखरलें जातें.

दुसराना जीवनर, गांड ठेननी पेनरर:–

आळशी माणसास उद्देशून ही म्हण वापरतात. खानदेशांत कांहीं ठिकाणीं पेवाचे–बळदाचे सडास घरात असतात आळशी माणसास दुसऱ्यानें परसाकडे घेनून जावें अशी अपेक्षा असते.

दुसराना जिवु जास, तू जिलबी खास :–

दुसऱ्याच्या जिवावर मौज मारणारास उद्देशन ही म्हण वापरतात.

देनऽ घेनऽ कूच, बोलनऽ लेवडऽ ऊच. :–

दातृत्वाच्या बाबतीत शून्य कोणी मागावयास आले असताना वढाईखोर मनुष्य दान करडीचेंही न करतां फक्त त्याला बडाईच्या आत्मश्लाघेच्या व उपदेशाच्या गोष्टी सुनावतो. कर्तृत्वाला पारखी असणारी वढाईखोर माणसें जगाच्या तिरस्कारास पात्र होतात.

देन नाहीं देव्हारीं, दिवटया बुधल्या सवारी. :–

गोंधळ घालण्यासाठीं आरतीचा कुळाचार करण्यासाठीं मुख्य देवाचा देव्हाऱ्यांत पत्ता नाहीं; देव नसतानाही एकादा मनुष्य दिवट्या घेऊन गोंधळ करू लागल्यास जगांत त्याचें हसूं होईल

मनुष्यानें दूरदर्शीपणानें इप्सित ध्येयपूर्तीसाठीं पुढल्या गोष्टीची तजवीज करून ठेवावी. कशालाच कांहीं पत्ता नसतांना एकादा मनुष्य त्याच्याही पुढील गोष्टीची व्यवस्था करतो त्यावेळेस ही म्हण वापरतात.

**दृेड शानाना, बइल रिकामा :—**

जो फार शहाणा मनुष्य असतो, त्याचें हटकून नुकसान होतें.

**देव घरना उलटा त्यांव, गरीब घर च्यात्र च्यात्र ( किंवा त्यांव त्यांव ) श्रीमंतले पयसांनी हाव—**

देवाची करणी अगाध श्रीमंताच्या घरीं पैसा भरपूर असूनही त्यास पैशाची हाव असते; पण गरीबाच्या घरीं मुलाची भार त्याव असते.

**दोन दिवस सासूना, दोन दिवस सूनना—**

हाताखालीं राबणाऱ्या माणसाविषयीं नेहमीं सहानुभूति बाळगावी प्रत्येकाच्या आयुष्यात उत्तम, मध्यम, अधम व नंतर कालांतरानें त्याउलट अधम, मध्यम, उत्तम दशा येत असते.

**धड जातना ना धड गोतना—**

जातीचाही नाहीं आणि गोताचाही नाहीं. कांहींच अर्थाअर्थी संबंध नसणें, असा अर्थ.

**धड खावाले न मिळे लाग म्हने रांधाले—**

खाण्यापिण्याची सवड न करतां कोणीं स्वयंपाक करावा अशी इच्छा प्रदर्शित करणाऱ्या माणसाला उद्देशून ही म्हण योजतात.

एकादे विशिष्ट घेर अगर सुख हवें असल्यास अगोदर योग्य त्या साधनांची तजवीज करून ठेवणें इष्ट असते.

**धवयाना जोडे पिवया बांधा वान ना लांगे गुन लागे—**

'संगतिः संग दोषाः' पांढरा बैल खट्याळ असल्यानें तो सुधरावा म्हणून पिवळ्या रंगाचा बैल त्याचे जवळ बांधला त्याचे चांगले गुण पांढऱ्या बैलानें तर उचलेले नाहीतच पण पिवळयानें मात्र पांढऱ्याचे गुण उचलले.

**धेडम धडा, मिठना खडा—**

खंडीभर दुधांत मिठाचा खडा पडल्यानें तें नासून जाते. चांगल्या गोष्टींचा नाश अल्प अशा वाईट गोष्टीमुळेंही होत असतो. ही गोष्ट लक्षांत ठेवून प्रत्येकानें वाईट गोष्ट न करण्याविषयीं दक्षता बाळगली पाहिजे. 'खंडीभर दुधमा मुतीगया' हा सदृश वाक्प्रचार सांगता येईल

**धोबीनऽ कुतरडऽ घड घरनऽ ना घाटनऽ—**

धोबीका कुत्ता न घरका न घाटका—

**नवरात काकडी, धा हात बी. :—**

गोष्टींत तथ्यांश अगदी अल्प असावयाचा पण त्या गोष्टीत खूप तथ्य आहे असे अघळ पघळ भाषणानें चढेजाव करून भासवावयाचे; मिया मूठभर दाढी हातभर, अशी दुसरी सदृश म्हण आहे

**नवरी घनी नादाले, ववली नही रांधाले :—**

नवरी घरी नांदावया आली पण स्वयंपाक करण्यासाठीं

मातीचें भांडे देखील घरी नाहीं लग्न करण्यापूर्वी गृहस्थिती अनुकूल करून घ्यावयास पाहिजे.

**नयाना नव दिन :–**

कोणतीही गोष्ट नवीन असली कि तिचे कोड कौतुक होत असते.

**नवरा एकपट ते बायको दसपट :–**

नवरा हा एकपटीनें हट्टी व खर्चिक असला व बायको त्याच्यापेक्षांही जास्त हट्टी किंवा खर्चिक असली कि संसाराची वाताहत होण्यास उशीर लागत नाहीं.

**नकट ऽ व्हाव ऽ पन धाकट ऽ नहीं होऊं :–**

नाक नकटे असल्यानें फारसें नुकसान नाहीं; हें शारिरीक व्यंग मनाला इतकें क्लेश देणारें नसतें. मात्र धाकटे होण्यानें प्रत्येकाच्या शिव्या खाव्या लागतात.

**नवल्या बामननी लिधी गाय, वडांग मोडी खोंडा खाय :–**

नवल ब्राह्मनानें गाय घेतली तरी वडांग मोडून खोंडे खावयास लागली. शंकरानें हौसेनें भस्मासुर निर्माण केला. तोच शंकराच्या डोक्यावर हात ठेवण्यास तयार झाला. कधीं नवत हौस म्हणून घेतलेली एकादी गोष्ट अती तापदायक झाली असतांना ही म्हण वापरतात.

**नवर देवले झाया वात, नवरीले भरनी धडकी :–**

परदेशीन बडवे रातभर ढोलकी.

**नवरा मरो की नवरी मरो, ब्राह्मणाला दक्षिणेची गरज :-**

नवरा मरो किंवा नवरी मरो, ब्राह्मणाले दक्षिणा जोईजे. परदेशीन बडवे रातभर ढोलकी, समानार्थक म्हण आहे. परदेशी लोकांच्या लग्नामध्ये ढोलके वाजवितात., नवरा नवरी आजारी असताना अगर आनंदी मनस्थितीत नसतांनाही ही गोष्ट. एखादी गोष्ट करण्यास ती प्रासंगिक आहे किंवा नाही हें पाहणें जरूर असते.

**नवती उनी आंगवरी, आकासले हेपल्या मारी—**

तारुण्यउन्मादात संयम नसल्यास अविचाराचीं कृत्यें माणसाकडून होतात. व त्याबद्दल जगाच्या निंदेस, उपहासास तो पात्र होतो.

**नवरा चुमक बायको हुचर पाव्हना ( किंवा मायबाप ) फिरे दारोदार—–**

नवरा कनडी चुंबक; बायकोस काम करण्याचा कंटाळा असल्यास आल्यागेल्याचें आदरातिथ्य त्याच्याकडून होत नाहीं.

**नष्टाशी हारल, कडू कारल—**

नष्ट माणसापासून दूर राहावें. कारले तुपांतहि साखरेत घोळले तरी तें कडूच राहते. नष्ट माणसापासून पराजित असा शेरा मिळाला तरी चालेल. त्याचा संबंध नको, दुर्जनं प्रथम वन्दे.

**नाकथीन मोती जड—**

नाकापेक्षा मोती जड.

आपल्या ताब्यातील कोणतीहि व्यक्ती वरचड झाली असतांना

या म्हणीचा उपयोग करतात.

**नाशीकले गया पाव्हना, गंगेवर कोलडा फराय खायी ना-**

नाशीककराच्या आदरातिथ्याच्या वाईट पद्धतीबद्दल असंतुष्ट बाहेरील पाहुण्यानें वरील उद्‌गार काढणें सहाजिकच आहे. नाशिकला तीर्थयात्रेच्या निमित्तानें अनेक पाहुण्यांची सारखी वर्दळ असल्यानें नाशिककर पाहुण्याविषयीं बेपर्वाई दाखवितात. त्यावरून एकाद्या ठिकाणीं पाहुणचारांत न्यूनता आढळून आली असतांना ही म्हण वापरतात.

**नाचता येईना म्हने आंगन वाकडऽ, रांधता येईना म्हने वल्ला लाकड—**

स्वताची कोणती गोष्ट करण्याची कुव्वत नसली तर दुसरेंच कारण शोधून ही गोष्ट करतां येत नाहीं असें भासविणें. पण हुशार माणसें असल्या व्यक्तीची खरी किंमत तेव्हांच ओळखतात.

**नाजुक बाईना नाजुक नखरा, कामधान सोडी सतरा चकरा किंवा नखऱ्यांनां भवती सतरा चकरा :-**

नट्टापट्टा करण्यातच भूषण मानणारी बाई कुच कामाची असते. नाक खाजे नकटी खिजे, उन्याले दुन ही सदरा म्हण. व्यंग असलेल्या माणसाला उणे सहन होत नाही. सहज केलेल्या गोष्टाचाही तो विपरीत अर्थ घेतो.

**निसेलनी गांडवर निमन ऽ झाड, छाया घर नहीं ते ऊन सरी पाड :-**

निर्लज्ज अशा आळशी माणसाच्या ढुंगणावर निंबाचे झाड,

छाया घर किंवा उन तरी पाड. आळशी माणसाना बोलण्याचे कांहीं वाटत नाहीं, ते निर्लज्ज असतात.

**निसागता गांडमा झाडनी गयी, निसाग म्हने माले सावली जयी :–**

अती निलाजरा मनुष्य अत्यत निष्काळजी असतो. त्याला काम करण्याचा कंटाळा असल्यानें सोरें टेखिल चुकवावें असें वाटते व तें काम टाळण्यासाठीं वाटेल तशीं निर्लज्जपणाचीं उत्तरें देतो. त्याला आपल्या निर्लज्जपणाच्या वर्तनाबद्दल जणुं निंदेची पर्वा वाटत नाहीं. निर्लज्जाच्या ढुंगणांत झाडणी गेली, निर्लज्ज म्हणतो मला सावली झाली. असा या म्हणीचा अर्थ. स्वतःला अपायकारक अगर अपमान कारक गोष्टींबद्दलहि निष्काळजी माणसाला पर्वा वाटत नाहीं.

**निघेरे तारा जेव सोनारा :–**

सोनाराची पंगत तारकाचा उदय झाल्यावरच बसावयाची. वेळेवर कधींहीं कोणी उपस्थित राहणार नाहीं.

**नेसख ते नेसख धान ऽ नेसख, नही ते नागीच चंठख :–**

को० त्याहीं विकट परिस्थितींत डामडौल करण्याची वृत्ती न सोडणें; वारा येईल तशी पाठ धावयास पाहिजे. आत्यंतिक गरजेच्या वस्तुविषयीं फार चिकित्सा न करतां उपयुक्ततेकडे पाहूनहि तो पदरांत पाडून घेणें, हाच खरा शहाणपणाचा मार्ग आहे.

**पाये जारो पन नाक ना जावो :–**

सर्वस्व गेलें तरी चालेल, पण रूस्व, स्वाभिमान जातां

कामा नये.

**पाटील भाऊच्या मोठमोठ्या मिशा, घरच्या बायका धुवडी जशा :**

बढाईखोर अगर आत्यताखोर मनुष्याच्या घरींच न्यूनता आढळते. यांतच थोडा बदल खालील म्हणींत आढळतो.

**पाटील बुवांच्या बड्याबड्या मिशा आणि घरच्या बायका घुवडी जशा :-**

बाहेर शेखी मिरवणाऱ्याच्या घरींच सावळा गोंधळ जास्त असतो.

**पारखी पाठवर खाय त्याचे स्वस्त महाग काय ? :-**

- दुसऱ्याच्या जिवावर जो मौज करतो त्याला बाजार भाव स्वस्त आहे किंवा महाग आहे याची विचारपूस करण्याची गरज नसते.

**पाप नहीं देनार ते पून काय देई :-**

कंजुष मनुष्य स्वतःच निरुपयोगी व टाकावू वस्तू देण्यास तयार नसतो; मोलाची वस्तू कशी काय सोडणार ?

**पाटीलकी उठनी नी बोकांडी बठनी :-**

कोणत्याहि मान सन्मान अगर जबाबदारीची इच्छा नसतांना तो सन्मान अगर जबाबदारी दैवयोगानें लाभणें. (२) जाबाब-दारीच्या जागेमुळें मानसन्मान जरी मिळतो तरी एकादे वेळेस तीच गोष्ट माणसाला खड्यांत घालण्यासही कमी करीत नाहीं ॥

**पाटीलन ऽ घोडऽ म्हारले भूसन :—**

घोडे पाटलाचें व महाराला त्याबद्दल भूषण वाटतें. दुसऱ्याच्या वस्तूबद्दल अभिमान बाळगण्यांत अर्थ नाहीं. याच अर्थी गाडी घोडऽ लोकन ऽ भूषग मना बापन ऽ अशी म्हण आहे.

**पाद ते निंघी गई फोकट किंवा खालीपिली टिरी आवयस—**

वेळ निघून गेल्यावर मागाहून विशिष्ट गोष्ट केल्यानें फायदा होत नाहीं. पाद निघून गेल्यावर टिरी आवळणें काय कामाचें ?

**पावसा मिचुक रान ( खेत ) सुनऽ माडी मिचुक माहेर सुनऽ कंथा मिचुक सासर सुनऽ :—**

पावसावाचून रानाला किंवा शेतीला शोभा नसते. आई शिवाय माहेरी मौज वाटत नाहीं व नवऱ्यावाचून सासर ओके ओके वाटते. घरांत मुख्य गोष्ट नसल्यास घर खावयास उठते. किंवा एकाधा समारंभास मुख्य इसम अगर वस्तू नसल्यास त्या समारंभास शोभा येत नाहीं.

**पदरी पडन झोडं, त्याले हसी करावा गोड —**

पदरांत झोड मनुष्य पडले असतांना त्याला कसें तरी वागून घ्यावें. एकाधा सद्गुणी पतीला बायको जर कर्कशा मिळाली किंवा सद्गुणी स्त्रीला जर पती व्यसनी मिळाला तर निराशेनें तो म्हणा किंवा ती म्हणा अशा व्यक्तींशीं संसार करते. अशा अर्थानें ही म्हण योजलेली आहे.

**परदूक शीतय—**

दुसऱ्याच्या दुःखाबद्दल यत्किंचितही सहानुभूति न वाटणें.

**पसडानऽ लेनऽ पायलीनऽ मोर—**

बाजारात वस्तू घ्यावयाची ती अत्यंत अल्प अशी विकत घ्यावयाची व पैसेही थोडे जवळ असावयाचे. मात्र एकदम ज्यास्त वस्तूंचा भाव करावयाचा हे करणे व्यवहारास धरुन नाहीं.

**पहिल्यां दाव पाव्हना, दुसऱ्यां दाव पई, तिसऱ्या दिशी तुनी अकल कथा गयी—**

पहिल्या दिवशीं कोठेंही पाहुणा म्हणून गेल्यास व्यवस्थ नीट राहते व योग्य तो पाहुणचार त्याला मिळतो पण तोच पाहुणा वारंवार येऊन त्रास देऊ लागला तर, अगर खूप दिवस राहू लागला तर त्याला मान मिळत नाहीं.

**परायाना माल, लालम लाल:—**

दुसऱ्याच्या माळावर चरणारा सदा पुष्ट असतो.

**पटका बरा पन कटका खोटा:—**

एकवेळ मार दिलेत्र परवडला फारतर त्यामुळें शरिरास थोडी इजा होते, पण दररोजची कटकट वाईट. त्यामुळें मानसिक स्वास्थ कायमचें नाहिसें होतें.

**पलपल घडी, हरबरा खुडी:—**

प्रत्येक क्षणाक्षणाला हरबरा खुडण्यास हरबऱ्याची वाढ होणार नाहीं कोणत्याही चांगल्या माणसास एकादे वेळेस त्रास देणें क्षम्य ठरते पण वारंवार त्रास देऊ लागल्यास त्या माणसाचें वाटोळे होण्याचा संभव असतो. ऊस गोड झाला तर मुळासुद्धां खाऊं नये असा इत्यर्थ (गोड ऊस आया ते मुयसकट नहि खावा).

**पादा पन नांदा:—**

काही करा पण काम तडीस न्या.

**पोरेसना गाडी ती तीन कास घाडी, वाटवर जायी ती मुडो पडी :—**

वडाच्या पोक्त माणसाच्या वृत्तीत व ल्हान माणसाच्या वृत्तींत फरक असतो. मुलाची गाडी ही फक्त तीन कोसपर्यंत वाढली. एवढ्या लहान मजलीतही ती व टेरर मोडून पडली. ल्हान मुलाच्या कर्तबगारीची व मोठ्या माणसाच्या कर्तबगारीची तुलना करता येत नाही, असा भावार्थ.

**फद्याना साबू घरय साबू —**

दिडकाच्या साबूनें पांढरे शुभ्र कपडे धुऊन छानछोकीनें राहणारा गृहस्थ थोडक्यात होत पुरवून घेणाऱ्या रंगेल माणसाविषयी ही म्हण आहे

**फद्याना भाजी, व्हई जाय राजी —**

आपळा देऊन कोहळा काढणे. थोडक्या भाजानेंही बापरोचे मन राखण्याचा प्रयत्न करणाऱ्या पतीला उद्देशून ही म्हण योजलेली आहे. अल्प खर्चानें मोठाली कामें होत नसतात.

**फद्या नहीं खिसाम, आणि चालना धुयाना बजारमा:—**

या म्हणाच्या सदृशच अहिराणीत हातमा नहीं दिडकी जीव येई धटकी ' ही म्हण आहे. जवळ कोणत्याहि प्रकारची सामग्री नसताना मोठमोठे मनोरथ सिद्धीला नेण्याचा प्रयत्न करणाऱ्या माणसाविषयी ही म्हण आहे. अशा माणसाची फजीती

झाल्याशिवाय रहात नाहीं. धुळ्यासारख्या मोठ्या शहरांतील बाजारांत जाणें असल्यास खिशांत बरेचसे पैसे घ्यावे लागतात. एरव्हीं फजीती होते.

**फयानी भाजी लेवानी तीचीं चार जागऽ देखनऽ पडसः—**

दिडकीची जरी भाजी घ्यावयाची झाल्यास दोन चार ठिकाणीं भाजी चांगली कीं वाईट हा शोध घ्यावा लागतो; व भावही विचारावा लागतो. कोणतीही गोष्ट वापरावयाच्या अगोदर चिकित्सा करणेंच श्रेयस्कर. विशेषतः वधुवर संशोधनांत पुसतपास बऱ्याच ठिकाणीं करावाच लागतो.

**फुकटनी खीर, गाव भवती फीरः—**

फुकटची खीर खाऊन मस्त झालेला मनुष्य गांवांत फिरतो. दुसऱ्याच्या जीवावर चैन करणारी माणसें त्रासदायक असतात.

**फुकटनी खीर, हगत फीरः—**

स्वस्त अशी कोणतीही वस्तू खाल्यास अपचन होऊन हगवण लागते. उपयुक्ततेकडे लक्ष देतांना कोणतीही वस्तू स्विकारल्यास शेवटीं ती आपल्यालाच त्रासदायक होते.

**फुकट फाकट खाय, त्याले स्वस्त महागऽ कायऽः—**

जो फुकट खातो त्याला पदार्थ स्वस्त आहे कीं महाग आहे हे विचारण्याची आवश्यकता नाहीं.

**बजारमा तुरी, भटभटनीले मारीः—**

बाजारांत तुरी आणि भट बायकोला मारी. जी गोष्ट माणसाच्या हातीं नसते अशा गोष्टींबद्दल आपल्या माणसाला विनाकारण

दोष देणे योग्य होणार नाहीं.

**बईल गाभन, नववा महिना.—**

आपल्या कामाशीं काम ठेवणारीं माणसें वितंडवाद करणाऱ्या, वारंवार खोटे करणाऱ्या माणसाच्या भरीस पडत नाहींत. होयला होय म्हणून वेळ मारून नेतात.

**बायको घालस हूरी बारी, म्हनस गांवमा चौधरी:—**

घरात कजाग बायकोचा वर चष्मा असतांना त्याच्याशीं हुज्जत घालीत असतांना व अपमान करीत असताना तो स्वत.ला गावाला न्याय देणारा व भांडणें मिटविणारा चौधरी म्हणवितो. त्याला स्वत.चीं घरचीं भांडणें मिटविता येत नाहींत, तो बाहरचीं भांडणें कशीं मिटविणार !

**बाईले बारा बुध्यां:—**

नारी जात चंचल असल्यानें स्त्रीनें दिलेल्या वचनावर विश्वास ठेवू नये. कारण कोणत्या वेळेस तिच्या बुद्धींत पालट होईल हे सांगता येत नाहीं.

**बायकोना बईल, येड्यावानी व्हईल —**

स्त्रैण मनुष्य बायकोसाठीं वाटेल तीं कामें करतो. तिच्यासाठी वेडा झालेला असतो; स्त्रीच्या मोहनीनें तो पूर्ण भारला जातो.

**बाहेर बडम, घरमा कुर्यादनऽ कढनः—**

बाहेरच्या जगात बृहस्पतीसारखे वागावयाचे व रुबाब दाखवावयाचा पण घरात कदान्नालाहि महाग असावयाचे अशा माणसाची जग खरी किंमत ओळखते. याच अर्थाची घरचर नरोटी

आखु बाजीरावन्या गोटी ही म्हण आहे.

**बारा घरना पुंजाः—**

गावांत सर्वत्र असलेल्या पाहुण्याची व्यवस्था कोठेहि लागते. एका ठिकाणीं न राहणाऱ्या माणसास बारा घरना पुजा म्हणतात.

**बाईनऽ फुल, बाईले मोठा मान याहिलेः—**

बाईची फुलें बाईला व मोठा मान व्याह्याला. कजाग विहिणीची संभावना भांडूनच करावी लागते. व्याह्यास मात्र मोठा मान द्यावयाचा Tit for tat किंवा जशास तसें या म्हणी सारखी ही म्हण आहे.

**बायको ना पोर ना जीवले घोरः—**

बायका पोर नसल्यानें निष्काळजी असतांना संसारात पदार्पण करून जीवाला कोण घोर—काळजी करून घेईल.

**बारास्नी माय खाटवर जीव जाय ( लेवा पाटीदारी )**

चारल्नी माय खाटवर जीव जाय ही म्हण पहा.

**बारा वर्सऽ उपाशी पारनऽ फेडनऽ गुताशीः—**

घेयाला साजेसेंच सदैव वर्तन पाहिजे.

**बुड्डी घोडी, लाल लगामः—**

म्हाताऱ्या घोडीला लाल लगाम शोभत नाहीं. म्हाताऱ्या स्त्रीलाहि वेषभूषण शोभत नाहीं.

**बुवानी दाढीले, बाईना साडीलेः—**

नटवेपणा व्हान छोकरीच्या किंवा अति निर्मळपणाच्या कल्पना परिस्थितनुसार असतात. एकदां स्वतःला मूलबाळ झाले म्हणजे

मुलाची विष्ठा मुलाच्या वडिलाच्या दाढीला न मुलाच्या आईच्या साडीला लागली तरी चालते. पूर्वीच्या त्याच्या स्वच्छपणाच्या कल्पना मेंदेन अशा वेळीं टिकू शकत नाहीं.

**बोलाय घडायनी गाठः—**

एकादी गोष्ट अमक्या रितीनें अशा रितीनें बोलावयाची वेळ वं ती गोष्ट अकस्मात घडून यावयाची वेळ एक होणें यालाच काकतालीय न्याय म्हणतात.

**बोलरे बोल नान्या म्हने पाटीभर गवऱ्याः—**

नान्या बोलत नव्हता म्हणून आर्जवें करून त्याला बोलावयास लावलें. त्यानें 'पाटीभर गवऱ्या' असें बोलून आपल्या मंद बुद्धिचें प्रदर्शन केलें एकाद्यास मोठा मान द्यावा पण त्यानें त्या मानाला साजेसे वर्तन न करता भलतेच अनिष्ट वर्तन करावें, अशा वेळीं मान देणाऱ्यास अशा मंद बुद्धीच्या माणसास उगाच मान दिला असें वाटू लागतें. याच अर्थाची बोलरे नान्या ' म्हने बोडऱ्या क्षायात साऱ्या ' अशी ही म्हण आहे.

**बोलाले टम राघो, कामले आग लागोः—**

बोल घेवडी माणसें बोलण्यात पटाईत असतात तरी अयत काम चुकार असतात.

**बोला म्हनानी नही लाज, हिजडा म्हने दारु पाज —**

निर्लज्ज माणसें जग निंदेकडे लक्ष न देतां आपले स्वैर वर्तन तसच चालू ठेवतात.

**भाऊ ममावस पोर, बाई निजनी निझरः—**

गृहस्थ मूल सांभाळतो व बाई झोपलेली आहे. स्त्रीला संसाराची काळजी नसल्यास पुरुषाला घरांतील व बाहेरील कामे करावीं लागतात.

**भाडाना घरथीन खोपडी बरी, रांडायलेल ननीनथीन सवत बरीः—**

भाड्याच्या घरांपेक्षां स्वताच्या मालकीची झोपडी असली तरी ती बरी असते. व विधवा नणंदेपेक्षा घरांत सवत असली तरी चालेल. कारण भाड्याच्या घराचा मालक व विधवा नणंद ( वाड्यात असल्यास ) ते घरांतील इतर मंडळींना सळो कीं पळो करून सोडतात.

**भायेर गोड गोड, घरमा मूग जडः—**

जो घरांत धुम्याप्रमाणें वागतो व बाहेरच्या माणसाशीं गोड गोड बोलतो अशाला उद्देशून या म्हणीचा उपयोग करतात.

**भाडाले बारा आडतऽ घरमा नही शेल जोतऽः—**

बाहेरच्या माणसांना उपयोग करूं देण्यासाठीं गांवांत इतरत्र न मिळणाऱ्या बहुमोलाच्या वस्तू देखिल जरूरीपेक्षां जास्त खरेदी करून ठेवलेल्या असतात. मात्र घरांत लागणाऱ्या अल्पमोलाच्या आवश्यक गोष्टींची मात्र उणीव असते. भाड्यानें देण्यासाठीं बारा आडते आहेत पण घरांत बैलांसाठीं शेल जोते जूं व दोरखंडही नाहीं असा अर्थ या म्हणीचा आहे.

भिलनींना नाहा, कड्काडनींना लाहा:—

भिल्लीण बाया अत्यंत हेकेखोर. एकादी गोष्ट एकदां नाहीं असें म्हणाल्या तर कितीही आमिषें दाखविलें तरी त्या पुढें नाहींच म्हणत राहतील. कैकाडणी अति लागट असतात. त्यांना भीक नाहीं असें म्हटले तरी 'भीक' घेतल्यावांचून दारापुढून ढळत नाहींत.

भील बुद्धी, लवण कुदी:—

भिलाची जात अडाणी. अशी माणसें जास्तीत जास्त हुशारी दाखविणार म्हणजे काय करणार ? तर ओहोळावरून उडी सफाईनें मारून दाखवतील. सारांश अडाणी माणसाचा व्यवहारात फारसा उपयोग नसतो.

गायेर लाल्गन चुन्हा चुकीवन ( चुकीसन )

भुस कोंडा पाटीभर, चिकन चोपडऽ वाटीभर:—

रद्दी वस्तु जास्तीहि असल्या तरी त्याचा तादृश उपयोग नाही. उलट चांगली गोष्ट अल्पही असली तरी कामास येते. एकश्चन्द्रस्तमो हन्ति नच तारागणोऽपि च.

मनऽ दयन पाटलाना आये मी भल भलत्यानऽ दये:—

मी माझें दळण पाटलाच्या आळींतल्या बाईला दळण्यास दिलं व मी मात्र भलभल त्या बाईचें दळण दळायला आणलें असा अर्थ. स्वतःचें काम सोडून भलत्याच गोष्टी करीत बसणें योग्य नाहीं. काम सोडून बिछाया हुसकणें, अशी दुसरी म्हण आहे.

**म्हणायले एकादसी, समदऽ लक्ष टोपला पाशीः—**

एकादशीचा उपवास नाममात्र करावयाचा; पण फराळासाठीं सतत म्ह्यंशाक घरांतील फराळाच्या डब्याकडे लक्ष असायचे.

**म्हातरा नवरा, कुकाले आधारः—**

म्हातारा नवऱ्याच्या तरुण स्त्रीला स्त्रीसुखाच्या दृष्टीनें उपयोग नसतो. तथापि नवरा असल्यानें तिला आपले गर्हा वर्तन झाकतां येते. जीर्ण वस्तूही थोड्याफार उपयोगाच्या असतातच.

**मरनी मरी गया, पण शरन नही गयाः—**

दृढ निश्चयी माणसें मेरपर्यंत अवमान केलेल्या माणसाला शरण जात नाहींत.

**मरी जावो पण करनी बिगर ना जाओः—**

कर्तृत्व हीन जिणें जगण्यापेक्षां मरण बरें. मरावें परी कीर्तिरूपें उरावें.

**म्हईसनी रांधऽ व हेलानी खादऽः—**

सनसमा संयोग की जाहला. आळशी बायकोनें वाटेल तसा स्वयंपाक केला तरी निर्बुद्ध मनुष्य कुरकुर न करता खातो.

**मनऽ मतऽ म्हनशी, सांज सकाय उपाशीः—**

एखाद्या दिवशीं वरकरणी अत्यंत आपुलकी दाखवूनही प्रत्यक्ष संकटात कोणत्याही प्रकारची मदत न करणे हें तूं माझाच आहेत. हें तूं माझाच आहेस, असें म्हणून दोन्ही वेळीं पाहुण्यास उपाशी ठेवणाऱ्या यजमानाच्या वर्तनासारखे आहे. अशीच 'मनऽ म्हनी-हाय भीक मांगी खाय, ही म्हण आहे.

**माले नही चाड, तुले लागनऽ येडः—**

मला तुझी किंमत नाहीं पण तुला मात्र माझ्याविषयी भरपूर जिव्हाळा वाटतो.

**मालकीनें झाडे गोठा, मोलकरनींन्या पलंगापाशी खेटाः—**

नवरा वद चालीचा असल्यास कुलवान स्त्रीचे हाल होतात. मोलकरणीला मान देतो. व त्याच्या स्वतःच्या स्त्रीला हलकी कामें करावीं लागतात.

**माले नही आव्रू, मी कसाले घाव्रूः—**

मला आव्रूची चाड नसल्यानें घाबरण्याचें कारण नाहीं निर्लज्जं सदा सुखी.

**माले ना तुले, घाल कुतराले किंवा तुले ना माले घाल कुतरालेः—**

दोघांचें भांडण तिसऱ्याचा लाभ.

**माल त्याना हाल, फुकट्याना लाल गालः—**

ज्याचा माल त्याचे मात्र हाल होतात. आणि फुकट खाऊ लोक मात्र यथास्थित ताव मारतात. धन्याला धत्तूरा चाकराला मलिदा ही मराठी म्हण सर्वतोमुखीं आहे.

**माले पहानी मगम राहाः—**

मला पहा आणि रतून जा. कोणीहि सक्रीय सहानुभूति दाखविली तरच गुणगान गावें. श्रीमंताच्या अगर मोठ्या माणसांच्या मोठपणाचा अभिमान बाळगीत राहणें व्यर्थ आहे. दिखाऊ वस्तुंचा व्यवहारांत तादृश कांहीही उपयोग नसतो. नाजुक पणाच्या

नांवाखाली काम चुकार माणसाबद्दल कोणालाही आदर वाटत नाहीं.

**मानानऽ घेईना पोयी, पडल्या पडल्या टिकल्या चोरीः—**

सन्मानपूर्वक पूरण पोळीचे जेवावयास एकादास बोलावले असतांना मनुष्य जेवावयास जात नाही. मात्र पोटात कावळे ओरडावयास लागले अपल्यानें मागाहून ठिकल्या हरबऱ्याच्या दाळीचा खाद्य पदार्थ चोरतो.

**मांजरना गू, सारामा ना लिंपामाः—**

निरर्थक गोष्टीचा काहींहि उपयोग नसतो. मांजरीचा गू हा गाई म्हशींच्या शेणासारखा सारवण्याच उपयोगांत येत नसतो.

**' माल खाये गधडी मार खाये लोधडी ' किंवा माल खाये लोधडी मार खाये गधडी.—**

गाढव माल खाऊन पळून जातें, पण लोधडीस (नीलगायीस) निष्कारण मार खावा लागतो. चोराला सोडून संन्याशाला सुळी देणें, ही म्हण सदृश आहे.

**मायनऽ बोलन, नवरानऽ मारनऽ जी मनवर घरई तीना सवसार उडी जाई वारानरीः—**

ज्या स्त्रीला आईच्या उपदेशाचा व नवऱ्याच्या मारण्याचा राग येतो व त्याबद्दल कढत बसते. तिला संसाराचें सुख पुढें मिळण्याची शक्यता कमी. स्त्रियांनीं नेहमीं सहनशील असावयास पाहिजे.

**मी चालनु कामले, सेजी जेवाड नवरालेः—**

आपल्या स्वार्थासाठीं आपल्या कार्याची जबाबदारी दुसऱ्यावर

सोपविणें इष्ट नाही.

**मी न मनी चय, तिंतलऽ म्न्हाड लयः—**

मी व माझी आई लग्नाला उपस्थित असलों म्हणजे पुरे; निकटच्या माणसाव्यतिरिक्त इतर माणसाविषयीं, आप्तस्वकीयाविषयीं बेपर्वाई दाखविणाऱ्या कंजूष किंवा अति स्वार्थी माणसास उद्देशून ही म्हण वापरतात.

**मी बी रानी तु बी रानी, ढुंगन घोसाले कोन लये पानीः—**

सर्वांनीच स्वतःला अवास्तव महत्व दिलें व कामचुकारपणा केला तर मग आवश्यक गोष्ट कोणी करावयाची ?

**मिर्गाची सर आमृतनी धारः—**

मृग नक्षत्रांतील पाऊस हा शेतकऱ्यांच्या दृष्टीनें अत्यंत उपयोगाचा. हा पाऊस पडल्यानंतर धान्य चांगले उगवते याच अर्थाची मिरींगनी झड मोत्यानी नड.

**मिरींगनी धार, करे जीव गार हा म्हणी आहेत.**

**मुंगीले मूत ना पूरः—**

दुबळ्या माणसाला लहानसे संकटही भारी वाटते व ते त्याला घाबरून सोडूं शकतें.

**मुता पुरंता मामा हात्रमा घरवाः—**

कामा पुरता मामा.

**मोठा घरना पोकय वासा, किंवा मोठऽ घर पोकय वासा फुटी जाही वाडगी याही जाही रस्ताः—**

सरंजामी सरदाराचें किंवा वतनदाराचें अगर पोकळ डामडौल

मिरविणाऱ्याचे घर असले तरी ते कर्जापायीं आंतून पोखरलेले असते. कर्जापायीं डबघाईस आलेले असते. वर वरच्या डामडौलास भुलून जाऊं नये असा भावार्थ. चकाकते तें सोने नसते, ही सदृश म्हण सांगता येईल.

**याजले आग लागो मुद्दल ये ही ते भागः—**

व्याज नाहीं मिळाले तरी चालेल मुद्दल पदरांत पडलें तरी चालेल. वरकड कमाई मिळाली नाही तरी चालेल फक्त पोट पुरेल खावयास मिळाले म्हणजे पुरे.

**याय गया सरी, वैद गया मरीः—**

गरज गयी सरी वैद गया मरी, ही म्हण पहा.

**ये दगड, पड पायवरः—**

आपण होऊन खोडी केल्यास त्याचे दुष्परिणाम भोगण्यास तयार व्हावे लागते. आपण होऊन नुसती कुरापत काढून संकटांना आव्हान करणें या अर्थी ही म्हण वापरतात.

**येड्याले झायी बायको माय म्हनू की बोय म्हनूः—**

वेड्याला बायको करून दिल्यावर तो विचारतो कीं तिला आई म्हणू की आजी म्हणू.

**येवानीं एक लाज, जावान्या दोन लाजाः—**

कोणाकडे पाहुणा जाणें हल्लीं जीवावर येते व कोणाकडे दोन दिवस पाहुणचार खाऊन मन मोडून जाणेंही इष्ट नसते. भिडस्त स्वभावामुळें माणसाला त्रास होतो असा भावार्थ.

**येक डोया हासस, एक डोया रडसः—**

दुःखाचे व आनंदाचे प्रसंग एकदमच येणें. उदा. पितृनिधन व पुत्रप्राप्ती एकाच वेळेस होणें. आजा मेला नातू झाला, ही सदृश म्हण वापरतात.

**येयेना जायेना, भाजी भाकर खायेनाः—**

चोखंदळ व्यक्तीला स्वयंपाक तर स्वतः तयार करतां येत नाहीं व जें तयार केलेले अन्न आहे तेही ती व्यक्ति खात नाहीं. येत नाहीं जात नाहीं भाजी भाकर खात नाहीं. स्वतःला कोणतीहि गोष्ट येत नसल्यास मौन स्वीकारावे त्याबाबतींत चिकित्सा न करतांना ती गोष्ट राबविण्यास तयार व्हावे.

**रुख्रत ऊनऽ दनऽ दने आयी भायेर देखऽ त आरधीच पोयीः—**

पुष्कळ वेळीं मूळ जास्त महत्वाची गोष्ट अल्पप्रमाणांत असतांनाहि बाह्य डामडौलच आढळतो. पसारा जादा दाखवून दिशा भूल करणें असा अर्थ.

**रस्त्याने चाले नीट, घरमा नहीं तीलट मीटः—**

रस्त्याने वर मान करून चालणाऱ्याच्या घरांत तेल मीठ ह्या आवश्यक जिनसा नसतात. ' चावडीवर बठना नीट, घरमा नहीं तिखट मीट ' ही म्हण पहा.

**रांडी, सांडी, पाल मांडी, तिघी बहिनी बहिनीः—**

विधवा स्त्री, नवऱ्याला सोडून राहणारी स्त्री व बाजार करणारी स्त्री ह्या सारख्याच. विनयाची यांच्यापासून अपेक्षा

करणें व्यर्थ.

**रांड्या रावजी, जुवारीमा भड.—**

कणीस काढून घेतलेल्या ज्वारीच्या ताटाचा ज्याप्रमाणें कांहीं खाण्यासाठीं उपयोग नसतो. त्याप्रमाणें बायल्या माणसाचा जगांत कांहीं उपयोग नसतो. स्त्रियामध्ये लुडबुड करणाऱ्या माणसाचा उपहास ह्या म्हणीच्या द्वारें केलेला आहे.

**रातभर घुमे छिनाल नार, छु छा करे सटव्या यार:—**

दोन कावेबाज माणसे एकत्र झाली कीं आपला कावा उमगून येऊ नये म्हणून जगाच्या डोळयात धुळफेक करण्याचा प्रयत्न करतात. दोन व्यसनी माणसे एकत्र आलीं म्हणजे दुर्गुण लपविण्यासाठीं वाटेल तशा भूलथापा देतात.

**रायाना भात मना पंगतीले, म्हातारा नवरा गमतीले.—**

राळा हे अगदी हलके अन्न. यापासून भूक भागत नाहीं. पंगतीत राळ्याचा भात वाढला तर तो जसा शोभेसाठीं तसा म्हातारा नवरा खरे स्त्रीसुख देऊ शकत नसल्यानें तिला गम्मत म्हणूनच वाटतो. विषम विवाहाची ही चेष्टा आहे.

**रांडवले कुकूनी डोक उठाड कसाले:—**

विधवेला कुंकवाची उठाठेव कशाला, हा अर्थ म्हणीचा आहे. ज्या गोष्टींशीं आपला अर्थाअर्थी संबंध पोहोचत नाहीं. त्या गोष्टींविषयीं जांस्त चिकित्सा व लुडबूड करता कामा नये.

**रिकामा न्हाई आखू भीतले तुंबड्या लायी:—**

एखाद्या न्हाव्याला काम नसले म्हणजे त्यानें भिंतीला तुंबड्या

लावण्याचे काम करणें अनिष्ट तसें माणसानें रिकामपणाच्या वेळीं अव्यापारेषु व्यापार करूं नये.

**लंगडा ते लंगडा गावाआखेरची चरत नहीः—**

अंगा न्यून असतांनाहीं व कुवत नसतांनाही हजार भानगडी व सतराशें उचापती करणारीं माणसें असतात. अशा माणसांनी एका बाजूस गुपचूप वसणें सोयिस्कर असतें. त्यामुळें त्यांनाही कमी त्रास होतो व दुसऱ्यांनाही त्याचा त्रास भासत नाहीं.

**लाज ना लज्जा, मुडी जाय कज्जाः—**

निर्लज्ज वाटेल तशी बोलणी सहन करून घेतो. त्यामुळें कोणीहि वर्दळीवरच येऊं शकत नाहीं.

**लाजऱ्यानी फजिती, निलाजऱ्यानी नीचीतिः—**

लाजाळू माणसाची चटकन फजीती होते किंवा तो आपल्या लाजाळू स्वभावानें फजिती करून घेतो. निर्लज्ज मनुष्य मात्र आपल्या गैरसोयी निःसंकोची वृत्तीमुळें दूर करूं शकतो.

**लेनऽ ना देनऽ, फोकट धिंगानः—**

दुकानावर घेणें नाहीं देणें नाहीं आणि व्यर्थ बजबजपुरी माजविणें इष्ट नसते. कामांत निरर्थक व्यत्यय आणणाऱ्या व्यक्तीस उद्देशून ही म्हण आहे. लाज नही मना कोनी काही म्हना, निर्लज्जम् सदा सुखी !

**लेकी बोले, सुना लागे किंवा लेकरेऽ बोलन-सुनले लागनः—**

कोणालाहि थाद्दन पाहून बोलणें; सासू आपल्या लेकीला उद्देशून जरी एकाद्या गोष्टीविषयी नापसंती दर्शवित असली तरी

तिचा उद्देश सुनेनें आपले बोलणें ऐकावें असाच असतो. आपला उद्देश दुसऱ्यास सरळ न सांगतां आडमार्गानें सांगणें.

**लोकरुन देखवो आणि आपले इसरवोः—**

लोकांची अत्यंत हलाखीची स्थिती पाहून अगर दुःखें पाहून आपली स्वतःची दुःखें विसरून जाणें हाच खरा शहाणपणाचा मार्ग आहे.

**वर घर धकस, ते नवरा कोन करसः—**

सद्वर्तनी स्त्रीला उदरभरणासाठीं अगर चैनीसाठीं नवरा करण्याची आवश्यकता वाटत नाहीं, कारण तिला ज्या आवश्यक गोष्टी पाहिजे त्या आवश्य गोष्टी अन्य मार्गानें मिळूं शकतात. मग नवरा करून त्याची ताबेदारी पत्करण्याची त्यांच्या जीवावर येते.

**वरमाई छिनाल, ते वन्हाडले काय बोलः—**

वरातील संचालकच दुर्वतनी असल्यास वरातील माणसें दुर्वतनी बनतात.

**वरसानी उना घर, ते पायको झायी दूरः—**

उत्साहानें एकादी गोष्ट अपेक्षावी पण अपेक्षेपेक्षां कांहींतरी भलतीच गोष्ट घडून येऊन अपेक्षाभंग व्हावा असा अर्थ. शिकारके वखत कुत्तेकु हाग लगी, अशी सदरा म्हण सांगता येईल.

**व्हईनी बोंब तीन दिनः—**

होळीची बोंब तीन दिवस. वाईट काळही असून राहत नाहीं. उन्मत्त माणसाची नकशाही टिकणार नसतो. तो अल्पावधीच उतरतो.

**वावधानमा आरती:—**

प्रतिकूळ परिस्थितींत असतांना चांगली गोष्ट करणें इष्ट नाहीं. वादळ चालू असता देवाची आरती केल्यास ती विझून जाते. त्याप्रमाणें प्रतिकूळ परिस्थितींत असतांना एकादें कार्य केल्यास ते सिद्धीस जाणें कठीण असतें.

**वान गाईनी, करनी कसायनी:—**

चेहरा अगदी गरिब बाईसारखा मात्र अंत.करणानें कसायासारखा, दुष्ट वृत्तीच्या मनुष्यास उद्देशून ही म्हण वापरतात.

**वाहनी ते वाहनी, मनी टेक ते न्हायनी:—**

एक हट्टी स्त्री होती. तीला आपल्या कर्तृत्वाचा मोठा अभिमान वाटे. दुसऱ्याचा योग्य उपदेशही ती मानीत नसे. एकदा नदीला मोठा पूर आला. वया पुरांतील पाण्यातून त्‍ पलिकडे जाऊं नको, असें लोकांनीं नानाप्रकारें सांगून पाहिलें तथापि फाजील अभिमानास बळी पडून ती पाण्यांतून जाऊं लागली. थोडे पुढें गेल्यावर अर्थातच पाण्याच्या प्रवाहात ती वाहून जाऊं लागली. तरिही ती वाहता वाहता म्हणाली कीं, मी वाहिलें तर वाहिलें पण माझा अभिमान तर कायम राहिला.

**वाटवर वसस, नी कय पुसस:—**

उघडपणे गोप्यस्फोट कोणी करावा अशी अपेक्षा करणें. मुद्दाम होऊन कुरापत उकरून काढणें. खाजवून खरुज काढणें या अर्थी.

**वय गई पन सोय नहीः—**

म्हातारपण आले पण सारासार विचारशक्ती आली नाही. वांग्यातले पाणी कांद्यात (ले. पा.) कशीतरी साधासाध करणें.

**शेंबर लुगडा कुल्ला उघडाः—**

घरांत सर्व गोष्टींची रेलचेल असूनही दीनवाण्यॆपणानें वागणें.

**ज्ञानाले बोल, मुरखले टोलः—**

शहाण्याला शद्बाचा मार पुरे होतो. शहाण्या माणसास बोल नही काम भागते. तो पुनरुपी चुकांचीं पुनरावृत्ती करीत नाहीं. परंतु मूर्ख मनुष्यास टोले दिले म्हणजेच त्याला चूक उमजून येते व पुनः तसल्या प्रकारचे वर्तन करीत नाहीं.

**ज्ञानाले एक बात, मुरखले सम्दी वातः—**

शहाण्या माणसाला एकादी गोष्ट सांगितली कीं ती पटते. मुर्खाची रात्रभर जरी समजूत घातली तरी त्याची समजूत पटत नाहीं. या बाबतीतला कविवर्य वामन पंडीताचा श्लोक प्रसिद्धच आहे.

सशाचेही लाधे विपिनिं फिरतां श्रृंगही जरी।
परंतु मूर्खाचे हृदय धरवेना क्षणभरी॥

**शेरना गोया, येशीले टियाः—**

अन्न सामग्री थोडी असतांनाही सर्व गांवाला आमंत्रण देणें. फक्त शेराचा पिंड भिजवून सर्व गांव जेवण्यासाठीं बोलावणें, यांत बोलावणाऱ्याचा अदूरदर्शीपणा दिसून येतो. याच अर्थाची शेरना भंडारा गावले दांडोरा, अशी म्हण आहे.

शेत खाये लोधडी मारखाये गधटी—

मागील म्हणीच्या अगदी विरुद्ध म्हण— शेतांतील पिक नीळ-गाय खाऊन गेली व जवळच चरणाऱ्या गाढवीला मात्र निष्कारण दीक न नानाही सशानामुळें मार बसला. चोर सोडून संन्याशाला सुळी, असा अर्थ

शेंदूर सांगना आनी, मारुती उघली आना—

आभिप्रेत गोष्ट करण्याचें सोडून भलतीच गोष्ट करणे विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरम्। अशी सदृश म्हण सांगता येईल.

ममडऽ गांव मामान, येक नही कामनऽ:—

गावांत सर्वत्र नातेवाईक असतानाही संकटाच्या वेळा कोणीहि धावून येत नाहीं व उपयोगी पडत नाहीं.

नटवाडेले नही नवरा, नि म्हसूनोल नही वायको:—

सटवाईला नवरा नाहीं व म्हसूबाला बायको नाहीं त्यामुळे लोपाचें सुत जमते गरज, माणसाना आवडनिवड बाजूला ठेवूनही गरज भागविण्यासाठीं विनवण्या करणें भाग पडते व एकत्र राहणें भाग पडते व एकत्र राहावे लागते.

सवती सवतिचऽ भांडन, दया रायानऽ कांडनऽ

राळ्याचा भात काडावयाचा असताना जसा आवाज होतो तसें सवतीसवतींचें भाडण गाजते व ते भाडण लोकांना एकप्रकारें थट्टेचा विषय होतो.

सग्या भातना, वसुदेव काय कामना—

सगळ्या भाताचा वैश्वदेव काय उपयोगाचा. वैश्वदेवासाठीं अगदीं थोडा भात लागत असताना एकदा घरात शिजलेल्या सर्व

भाताचा वैश्वदेवासाठीं उपयोग करूं लागला तर त्याचें ते करणें अव्यवहार्य ठरेल. थोड्याशा गोष्टीकरता सर्वच पदार्थांना नाश करणें हा माणसाचा अव्यवहार्यपणा ठरविण्यासाठीं या म्हणीचा उपयोग करतात. जसें अल्प वस्तूंची मागण्यासारखें आहे तसें वाजवीपेक्षां जास्त उपयोगांत आणणें इष्ट नाहीं. असा भावार्थ.

**समजे त्यानी मोत न समजे त्यानी चैत—**

जो जाणीव ठेवून काम करतो त्यालाच लोक काम सांगतात व त्यामुळें त्याला अत्यंतीक त्रास भोगावा लागतो. व जाणीव न ठेवणारा माणूस हक्कानें कोणतीही गोष्ट मिळवूं शकतो.

**सजननऽ गाडऽ दुसननऽ घोडऽ—**

दुष्मानाची गाडी चांगली असण्याचा संभव कमी परंतु त्याचें घोडे हे आपणांस ठेवता येत असल्यानें घोडे घेणें चांगलें. म्हणून सज्जनाची गाडी घ्यावी. व वैऱ्याचे घोडे घ्यावे.

**सदा हावडी, सदा रडीः—**

जो फार अघाशीपणा करतो किंवा लोभीपणा करतो त्याला नेहमीं पैशाच्या व वस्तूंच्या कमतेबद्दल कुरकूर करण्याची सवय असते.

**सस उठाना घाय ( घाई ) कुतरा मुताना घावः—**

शिकारके वखत कुत्तेकु हाग लगी, असा अर्थ. एक वेळीं अवसान घात होतो.

**सांग त वामन नी जी म्यात न्हांईः—**

ब्राह्मण भोजनासाठीं ब्राह्मण जेवावयास सांगितलें खरें त्याच्या

ऐवजीं न्हावी जेऊन गेले. एकादी गोष्ट अपेक्षेप्रमाणें न लागता भलत्याच कारणी लागली असतांना ही म्हण वापरतात.

**सांगाले नहीं चरम, काय सांगू करमः—**

एकाद्याचे अंगीं कोणतीही न्यूनता नसतांना कोणताही दोष त्यांच्यावर लावता येत नाहीं.

**सुलनी शालनी जत्रा चालनी किंवा सुलना सालना जत्रे चालन**

नट्टापट्टा करून यात्रेंत मिरवणें. नट्टापट्टा करून मिळविण्याची हौस असणाऱ्या स्त्रीला किंवा पुरुषाला उद्देशून ही म्हण आहे. सुल = नूर नाहीं पण जत्रेला चालली.

**सुई मांगे दोर , नवरी मांगे नवराः—**

योग्य वस्तू योग्य ठिकाणीं असल्यास नवल वाटण्याचें कारण नाहीं. सुईबरोबर दोरा व नवरी बरोबरच नवरा असणें हा नियमच आहे जगाचा. नवरा नवरीचा एकजीव असतांना अगर त्यांना एकमेकांचा क्षणाचाही विरह सहन होत नसतांना या म्हणीचा उपयोग करतात.

**सुटेल गघड उखल्ड्यावर, कलालनऽ पोर गुत्तावरः—**

मोकळे गाढव केव्हांही उकीरड्यावर सांपडणार व कलालचे मूल अनदोषीक संस्कारामुळें दारुगुत्त्यावरच सांपडणार यस्यया स्वभावो जातः स अति दुराति क्रमः असा भावार्थ, चुकलेला फकीर मशिदींत, या सदृश म्हण आहे.

**सुकना जीव, त्याले वाजस हिव—**

जीवाचें अतिशय कोड कौतुक करणें चांगले नाहीं. त्याचे

दुष्परीणाम होतात. सुखी माणसे निष्काळजी असतात. एवढ्या अडचणीतही ते वाऊ करितात. याच अर्थाची सुकना जीनुऽ त्याले दूक कस देऊ. अशी म्हण आहे.

**मुन घर खबरदार, उदार फिरे दारोदार—**

स्वतःच्या घरी सुनेपुढें. सासऱ्याचे कांहीं चालत नाहीं. त्याला कोणतीही गोष्ट करावयाची अगर देण्याची मनाई अस्ते. पण ह्याच वृद्ध गृहस्थ दुसऱ्याच्या घरीं उदारपणा दाखविण्याविषयें उपदेश करतो. स्वताच्या घरीं काडीचीही सत्ता नाहीं व दुसऱ्यानें उदारपणा दाखवावा अशी मात्र अशा माणसाची इच्छा असते. कांहीं अंशी 'हलवायाचे घरावर तुळशीपत्र' अशी मराठी मदश म्हण सांगता येईल.

· **सोड वाशींग नाहीं व्हत तुनी वायको—**

एकादी आततायी स्त्री मनाच्या विरुद्ध गोष्ट घडावयास लागली की लगेच वर्दळीवर येते व अविचारानें स्नेहाचे संबंध तुगारून देण्यास उद्यक्त होते. एखाद्या गोष्टीचा संबंध कायमचा मोडून टाकावयाचा असल्यास ही म्हण वापरतात.

**सोनानी सुरी झायी ते उरमा नही लेवानी** किंवा घालवा- -

सुरी सोन्याची असली म्हणून उरामध्यें थोडीच खुपसता येईल. कोणतीही गोष्ट कितीही भारी असली पण ती आपला सर्वनाश करणारी असल्यास तिला टाळणेंच श्रेयस्कर.

उदा०— अप्सरावत् सुंदर पत्नीचा लाभ करून घेण्यासाठीं दरा-दाराचे वाटोळें करणें केव्हांही इष्ट नसते.

